


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








वर्ष २९
अंक २
उन्हाळा
२०११



# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

**संपादक :** प्र०ना० परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द०भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

**संपादन-समिती :** प्र०ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

**लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता :** प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007. स्थिरभाष : (020) 2569 4617 चलभाष : 094225 09638

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनंद काटीकर, द्वारा, मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. चलभाष : 094216 10704

मुद्रण-स्थळ : एम०आर० ॲण्ड कं०, सदाशिव पेठ, पुणे 411 030. स्थिरभाष : (020) 2447 5939

---

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 093731 04903 **विजय पाध्ये** - 098220 31963. **marathiabhyasparishad@gmail.com** या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. वार्षिक वर्गणी - **विद्यार्थ्यांसाठी ₹ ७५/-**, **व्यक्तींसाठी** एका वर्षास ₹ १००/-; त्रैवार्षिक वर्गणी ₹ २५०/-, **संस्थांसाठी** एका वर्षास ₹ १५०/-; त्रैवार्षिक वर्गणी ₹ ४५०/-.

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणीशुल्क ₹ २०००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने भरता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. (चलनावर स्वतःचे नाव व पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वतःकडे ठेवण्यास विसरू नये.) **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹ ३,०००/-, अर्धे पान ₹ २,०००/-, आवरण-पृष्ठ (क्र० ४ = मलपृष्ठ) ₹ ५,०००/-, विशेष रंगीत पृष्ठ ₹ १०,०००/-

---

**प्रकाशन : त्रैमासिक :** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाची किंमत ₹ २५/-**



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका

## आवाहन

आज स्थानिक (प्रादेशिक) भाषांतून संगणकावर जे काम केले जाते त्यासाठी विविध टंकनिर्मात्यांनी विकसित केलेल्या टंकांचा तसेच विविध प्रकारच्या सॉफ्टवेअर्सचा उपयोग केला जातो. तशाच प्रकारचे टंक व/वा सॉफ्टवेअर इतरत्र संगणकांवर उपलब्ध असेलच ह्याची खात्री नसते. त्यामुळे आपल्या कामाची मुद्रित प्रत तयार करायची असेल तर अनेक समस्या येतात. परिणामी, आवश्यकता व इच्छा असूनही लोक संगणकावर आपल्या स्थानिक भाषेत काम करीत नाहीत.

**ह्या अडचणीवरचा एकमेव उपाय म्हणजे यूनिकोडचा वापर करणे.**

जगात आपण कुठेही गेलो तरी आपल्याला यूनिकोडचा उपयोग करून विविध भारतीय भाषांतून संगणकावर काम करता येते. विंडोज किंवा लिनक्स ह्या प्रचालन प्रणाली सर्वसाधारणपणे सर्वत्र वापरल्या जातात. ह्या दोन्हीपैकी कोणतीही प्रणाली संगणकावर असली तरी आपल्याला स्थानिक भाषेतून काम करता येईल.

मराठी अभ्यास परिषदेने ह्यात पुढाकार घेतला आहे. आपापल्या शाळा-महाविद्यालयांत किंवा कोणत्याही आस्थापनांत (बँका, सरकारी-निमसरकारी कार्यालये इ० ठिकाणी) आपल्याला परिषदेतर्फे आयोजित केल्या जाणाऱ्या कार्यशाळेचे आयोजन करता येईल. मराठी अभ्यास परिषदेशी संपर्क साधावा.

**प्रा० आनंद काटीकर 094216 10704**
**विजय पाध्ये 098220 31963**

---

## लेखकांसाठी सूचना

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे, ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतरही द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए० आर०' नको; 'अ०रा०' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी. लिखाणासोबत स्वतंत्र कागदावर स्वत:चा परिचय (शिक्षण, व्यवसाय, प्रकाशित लेखन इ०) थोडक्यात द्यावा. स्थिरभाष क्रमांक (संकेतक्रमांकासह) द्यावा.

---



अनुक्रमणिका

# संज्ञापन : वनस्पतींचे(ही)

**आनंद काटीकर**

माणसाने आपल्या मेंदूच्या बळावर सृष्टीतल्या अनेकानेक गोष्टी आपल्या ताब्यात घेतल्या आहेत, त्यांचे कार्यकारणभाव शोधले आहेत आणि आपल्या फायद्यासाठी त्यांचा हवा तसा उपयोग केलेला आहे. यातीलच एक महत्त्वाचा घटक म्हणजे वनस्पती. पोटाची भूक भागवणे, अंगात ल्यायला वस्त्रे मिळवणे, निवारा उपलब्ध करणे, आजारी पडल्यास औषधे देणे इत्यादी अनेक कारणांसाठी झाडांचा उपयोग माणसाने केलेला आहे, करतही आहे. याबरोबरीनेच आपल्या भावभावना अभिव्यक्त करण्यासाठीदेखील वनस्पतींचा उपयोग माणूस करत असतो. कागदाचा शोध लागेपर्यंत कमलपत्रापासून भूर्जपत्रापर्यंत सर्व प्रकारच्या पानांचा उपयोग माणसाने लेखनासाठी करून घेतला. सुंदर गुलाबाचे फूल देऊन प्रेमभावना व्यक्त केली. या प्रेमाचे प्रतीक म्हणूनच श्रीकृष्णाने प्राजक्तासारखा सुगंधी आणि सुंदर वृक्ष खास सत्यभामेसाठी स्वर्गातून पृथ्वीवर आणल्याची पुराणकथा आपल्या परिचयाची आहेच. 'हाती धत्तुरा दिला', 'आवळा देऊन कोहळा काढला' यांसारख्या म्हणी वनस्पतींच्या माध्यमातून मानवी भावभावना व्यक्त करतात किंवा 'फुलराणी'सारख्या कवितांमधून मानवी भावनांचे आरोपण वनस्पतींवर झाल्याची उदाहरणे आपल्याला दिसतात. मात्र वनस्पती स्वत:च काही भावभावना व्यक्त करू शकतात का, याविषयी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत तरी निश्चित काही सांगता येत नसे.

आधुनिक विज्ञानाच्या प्रसारानंतर, सृष्टीकडे केवळ भौतिक नजरेने पाहण्याचा दृष्टिकोन रूढ झाला होता. त्यामुळे चराचर सृष्टीत सजीवत्व पाहणाऱ्या भारतीयांच्या परंपरागत ज्ञानाला, मागासलेले म्हणून हिणवण्याची शैली सुशिक्षितांमध्ये रूढ झाली होती. जे जे पाश्चात्त्य ते ते उत्तम! प्राचीन भारतीयांचे ज्ञान म्हणजे भंपकपणा असे मानणारे वातावरण चहूबाजूला होते. महाभारताच्या शांतिपर्वातील १८४ व्या अध्यायातील ११ ते १६ हे श्लोक वृक्षांना ऐकू येते, त्यांना स्पर्शज्ञान असते, दृष्टी असते, गंधसंवेदना असतात, ते पाणी पितात, त्यांना व्याधी होतात, ते प्रतिकार करतात, सुखदु:खांचे ग्रहण करतात, कापल्यानंतर त्यांची पुन्हा वाढ होते म्हणूनच त्यांच्यामध्ये जीव आहे, असे सांगतात. यांसारख्या सर्व गोष्टी 'पुराणांतली वानगी' आहेत असे मानून त्याकडे दुर्लक्ष करण्याची सुशिक्षितांची मानसिकता होती. त्यामुळे रात्री झाडांना हात लावू नये, ती झोपलेली असतात; चुकून जरी झाडांना पाय लागला तर नमस्कार करावा, अशा समजुती; काही मंदिरांच्या सभोवारची देवराई आणि त्याविषयीची पावित्र्यभावना, वटपौर्णिमेसारखे सण इ० तून दिसणाऱ्या भारतीय मूल्यांना बालिश म्हणून संबोधणारे विद्वान चहूकडे होते. अशा वातावरणात जगदीशचंद्र बसू यांनी जगाच्या दृष्टीने निर्जीव अशा वनस्पतींवर संशोधन करण्यास प्रारंभ केला. आपल्या

संशोधनातून वनस्पतींचे सजीवत्व पटवून देण्यासाठी त्यांना खूपच संघर्ष करावा लागला.

जगदीशचंद्र बसू हे मूळ भौतिकशास्त्राचे अभ्यासक. त्या काळात भौतिकशास्त्राची विविध उपकरणे सहजासहजी मिळत नसत त्यामुळे बसूंनी अनेक उपकरणे स्वत: बनवली. वास्तविक ते विद्युत-चुंबकीय लहरींवर विविध प्रयोग करत होते. विविध पदार्थांवर या लहरींचा कसा परिणाम होतो याचा विचार करत असताना निर्जीव मानले जाणारे धातूही या लहरींना प्रतिसाद देतात, हे त्यांना जाणवले. त्यातूनच त्यांना वनस्पतींवरही हे प्रयोग करून पाहण्याची इच्छा झाली आणि एका महान वनस्पतिशास्त्रज्ञाचा जन्म झाला.

१९०१ मध्ये, इंग्लंडच्या रॉयल सोसायटीमध्ये वनस्पतींचे सजीवत्व त्यांनी प्रयोगांनी सर्व मान्यवरांसमोर सिद्ध केले. पण बसू पदार्थविज्ञानाचे अभ्यासक असल्याने आणि त्यातही भारतीय असल्याने ते अमान्य करण्यात आले. वनस्पती आणि प्राणिशास्त्राच्या संशोधकांत स्वत:च्या विषयासंबंधी असणारा संकुचित अभिमान इतका टोकाला गेलेला होता की पदार्थविज्ञानाचा एक संशोधक वनस्पतिशास्त्रात काहीतरी मूलभूत संशोधन करतो आहे आणि तेहि भारतासारख्या मागासलेल्या, गुलाम देशातला एक माणूस हे संशोधन करतो आहे हेच मुळी त्यांना पटले नाही. नंतर हेच निष्कर्ष स्वत:च्या नावावर खपवण्याचाही प्रयत्न वॉलर नामक एका पाश्चात्त्य शास्त्रज्ञाने केला. पण न डगमगता बसूंनी प्रामाणिकपणे आयुष्यभर वनस्पतींवर संशोधन केले. त्यातून १९०२ ते १९१८ या काळात वनस्पतिशास्त्रावर १० ग्रंथ लिहिले, १९३८ पर्यंत १३ खंडांचे संपादन केले, १३ वेगवेगळी उपकरणे तयार केली आणि अक्षरश: हजारो प्रयोग केले. या अफाट संशोधनामुळे अखेर जगाला बसूंची थोरवी कळलीच आणि उशिरा का होईना त्यांचे संशोधन साऱ्या जगाने मान्य केले.

बसूंच्या या कार्याचे मोल इतके मोठे आहे की वनस्पतींवर आजही मोठ्या प्रमाणावर संशोधन चालू आहे. वनस्पती सजीव असतात कारण 'त्या' श्वासोच्छ्वास करतात, त्यांची वाढ होते एवढेच आपण आत्तापर्यंत मानून चालत होतो. पण वनस्पतींची वाढ, त्यांचे जीवन, त्यांच्यावर अवलंबून असणारी जैविक सृष्टी या साऱ्यांमध्ये एक व्यवस्था आहे. वनस्पतींचे परस्परांशी असणारे संबंध केवळ जैविक नाहीत, तर त्यातही काही अन्य (भाषिक/मानसिक?) कारणे आहेत की काय याकडे आता संशोधकांनी आपला मोर्चा वळवला आहे. 'नेचर' किंवा 'सायन्स' यांसारख्या जगन्मान्य नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या काही लेखांतील संशोधनातून याविषयी अनेक आश्चर्यकारक गोष्टी समोर आल्या आहेत.*

वनस्पती आपल्या परिसराशी सतत संवादी असतात. त्या आपले रूप परिसराशी जुळवून घेतात. त्या दृष्टीने आपली मुळे, फांद्या यांना त्या विशिष्ट दिशा देतात. आपल्या स्वसंरक्षणासाठीही त्या पूर्ण विश्वाशी संवाद करत असतात. एखाद्या वनस्पतीवर, कीटकांचे अथवा परजीवी वनस्पतींचे आक्रमण झाले तर त्या वनस्पती विशिष्ट रसायनांच्या उत्सर्जनाने एक विशिष्ट गंध अवकाशात सोडतात. या गंधामुळे, या आक्रमणाचे नैसर्गिक शत्रू असणारे विशिष्ट कीटक आकर्षित होतात. मग हे कीटक तेथे येऊन त्या आक्रमणाचा फज्जा उडवतात. शत्रूच्या शत्रूशी असणाऱ्या या मैत्रीमुळेच या वनस्पती जगू शकतात. ड्रोसेरा इंडिका किंवा ड्रोसेरा बर्मानी यांसारख्या वनस्पती तर कीटकांना भक्ष्य करूनच आपले आयुष्य कंठतात.

विशिष्ट गंध उत्सर्जित करून त्या भक्ष्याला आकर्षित करतात. त्यामुळे त्यांना मांसाहारी वनस्पती म्हणायचे का प्राणी म्हणायचे, असा वादही शास्त्रज्ञांमध्ये अधूनमधून सुरू असतो! कीटकांना आकर्षित करण्यासाठी वनस्पती विविध रंग आणि गंध यांची मुक्त उधळण करत असतात. त्या आकर्षणामुळे काही कीटक, मधमाश्या, भुंगे, फुलपाखरे, पक्षी झाडाझाडांवर-फुलाफुलांवर जाऊन परागीभवन करतात आणि विश्वातील वृक्षराजी वाढवण्यात मुख्य भूमिका बजावतात. व्यापक अर्थाने बोलायचे झाल्यास या सृष्टीतले मनुष्याचे स्थान वनस्पतींच्या या संवादामुळेच सुखकर झाले आहे.

स्वसंरक्षणाबरोबरच, आपल्या परिसरात एखादी वनस्पती वाढू द्यायची की नाही याचा निर्णयही 'त्या' जागेत आधीपासूनच वास्तव्य असणाऱ्या वनस्पती करतात. आधीची झाडे तेथे स्वत:चे साम्राज्य प्रस्थापित करतात आणि इतर जातीच्या झाडांना वाढू देत नाहीत याची उदाहरणे आजही आपल्या आजूबाजूला सापडतात. पुणे विद्यापीठाच्या रम्य परिसरात वाढलेल्या 'डालबर्जिया' या परदेशी वनस्पतीमुळे (जी केवळ पावसाळ्यात हिरवीगार असते आणि इतर वेळेस एकदम सुकलेली दिसते) या परिसरातील स्थानिक झाडे मोठ्या प्रमाणावर नाहीशी झालेली आहेत, हे याचेच उदाहरण आहे.

हे कसे घडते? यावर झालेल्या संशोधनानंतर झाडाच्या सर्व अवयवांच्या कार्यावर प्रकाश पडतो. एखाद्या 'नको असणाऱ्या' झाडाला वाढू द्यायचे नसल्यास वनस्पती आपल्या मुळांपासून पाना-फुलापर्यंतच्या सर्व अवयवांना तशी आज्ञा देतात आणि त्यानुसार ते सारे अवयव वागतात. 'नको असणाऱ्या' झाडापर्यंत जीवनरस पोहोचू नये यासाठी वनस्पतीची मुळे प्रयत्न करतात. यासाठी आपल्या गरजेपेक्षाही जास्त जीवनरस शोषून घेऊन 'नको असणाऱ्या' वनस्पतीची उपासमार करतात. आजूबाजूच्या 'आपल्या' वनस्पतींनाही हा संदेश पाठवतात आणि मग सामूहिकरित्या 'नको असणाऱ्या' वनस्पतीची वाढ खुंटवण्यात यशस्वी होतात. यातूनही जर ती वनस्पती वाढलीच तर ती विशिष्ट वनस्पती ज्यांचे खाद्य आहे अशा कीटकांनाही आमंत्रण देतात आणि मग ते कीटक येऊन आपले भक्ष्य मिळवतात आणि 'नको असणाऱ्या' वनस्पतीची अखेर होते. याचा अर्थच असा की, मानवेतर प्राणिसृष्टी आणि वनस्पतिसृष्टीमध्ये संवेशवहनाची एक पद्धती आहे. ती एकमेकांशी संपर्काच्या आधारे आपले अस्तित्व टिकवू पाहाते.

आता प्रश्न उभा राहतो तो म्हणजे माणसाची भाषा वनस्पती समजू शकतात का? 'तारे जमीं पर' या चित्रपटात, निकुंभ सर (अमीर खान) ईशानच्या वडिलांना एक उदाहरण देतात, ते या निमित्ताने आठवते. ते म्हणतात, ''सालोमन बेटांतील आदिवासींना जेव्हा जंगल तोडून शेत तयार करायचे असते तेव्हा ते त्या भागातील झाडांना मनमुराद शिव्या घालतात. मग काही दिवसांनी ती झाडे आपली आपणच कोमेजू लागतात आणि अखेर मरतात.'' कदाचित उद्या या संदर्भातही संशोधन समोर येईल. ■

चलभाष : 094216 10704

*(या लेखातील काही संदर्भांसाठी फर्ग्युसन महाविद्यालयातील भौतिकशास्त्राचे प्रा० डॉ० नऱ्हे यांच्याशी झालेल्या चर्चेचा फायदा झाला.)

---





अनुक्रमणिका

# फेर्दिनां द सोस्यूर याचा भाषाविषयक विचार

**('कोर्स इन जनरल लिंग्विस्टिक्स' या ग्रंथातील निवडक वेच्यांचे भाषांतर)**

**भाषांतर : मिलिंद मालशे आणि चिन्मय धारुरकर**

**मराठी भाषांतरकारांची प्रस्तावना**

फेर्दिनां द सोस्यूर (१८५७-१९१३) हा आधुनिक भाषाविज्ञानाचा जनक मानला जातो.. विसाव्या शतकाच्या प्रारंभी त्याने भाषाविज्ञानाच्या आधुनिक मूलभूत तत्त्वाची मांडणी केली आणि त्यातून मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञाने या क्षेत्रामध्ये नव्या सिद्धांताची पायाभरणी झाली. या विचाराला 'संरचनावादी सिद्धांत' असे संबोधले जाते.

१९०६मध्ये ऐतिहासिक व तुलनात्मक भाषाशास्त्राबरोबरच 'सामान्य भाषाशास्त्र' या विषयावर सोस्यूरने व्याख्याने दिली. या व्याख्यानांमधून त्याने भाषेच्या स्वरूपाविषयीच्या आपल्या क्रांतिकारी विचारांची मांडणी करायला प्रारंभ केला. १९१३मध्ये वयाच्या छप्पन्नाव्या वर्षी निधन होण्यापूर्वी सोस्यूरच्या हातून या नव्या विषयावर कोणत्याही प्रकारचे लेखन झालेले नव्हते. परंतु त्याच्या व्याख्यानांमधील संकल्पना व तत्त्वे इतकी नवी होती की चार्ल्झ बॅली आणि अल्बर्ट सेशेहाये या त्याच्या तरुण सहकाऱ्यांनी त्याच्या नावे एक ग्रंथच प्रसिद्ध करायचे ठरविले; मात्र त्यांच्या हाती सोस्यूरची स्वतःची टिपणे वा संहिता नव्हती, तर त्याच्या वर्गामध्ये विद्यार्थ्यांनी व त्यांनी स्वतः घेतलेली टिपणे होती. यातून फ्रेंचमध्ये जी संहिता सिद्ध झालेली होती ती *Cours de linguistique generale* या शीर्षकासह सोस्यूरच्या नावे पॅरीसमध्ये १९१६मध्ये प्रसिद्ध झाली.

*Cours de linguistique generale* या ग्रंथाचे पहिले इंग्लिश भाषांतर वेड बास्किन यांनी १९५९मध्ये प्रसिद्ध केले. अधिक अलीकडचे रॉय हॅरीस यांचे भाषांतर १९८३मधील आहे. सगळ्यात अलीकडचे कॅरल सॅन्डर्झ व मॅथिव पायर्झ यांचे भाषांतर *'रायटिंग्झ इन जनरल लिंग्विस्टिक्स'* या सोस्यूरच्या समग्र लेखनाच्या भाषांतरामध्ये उपलब्ध झाले आहे.

सोस्यूरच्या पुस्तकातील तीन प्रकरणांचे भाषांतर पुढे दिले आहे. ही प्रकरणे सोस्यूरच्या एकूण प्रतिपादनाचा गाभा म्हणता येतील. समीक्षा, मानववंशविज्ञान, भाषाविज्ञान, चिन्हमीमांसा इ० विषयांवरील मूलभूत वेचे संग्रहित करून समग्र विषयाची वा त्याच्या विशिष्ट अंगाची ओळख करून देणारी लेखसंग्रह-प्रकारातील पुस्तके प्रसिद्ध होतात त्यांत ही प्रकरणे हमखास सापडतात. *कोर्स* या ग्रंथाच्या प्रास्ताविक भागात सात प्रकरणे आहेत. त्यातील दुसऱ्या प्रकरणात भाषाविज्ञानाची व्याप्ती व आन्तरज्ञानशाखीय देवाणघेवाणीत भाषाविज्ञानाचे स्थान हे विषय येतात. नंतरच्या म्हणजे तिसऱ्या प्रकरणात भाषाविज्ञानाची विषयवस्तू, भाषा-विश्लेषणासाठी केलेले समग्र वाचित वर्तन (लांगाज), भाषिक व्यवस्था (लांग) आणि वाचिक वर्तन (परोल) हे भेद यांबद्दल सविस्तर ऊहापोह येतो आणि

चिन्हमीमांसा म्हणजे काय इ० विषय येतात. *कोर्स*मध्ये प्रास्ताविक भागानंतर पाच विभाग आहेत. त्यांतील पहिल्या भागामधील पहिल्या प्रकरणात भाषिक चिन्हाचे स्वरूप विशद केले आहे व त्यात चिन्हक, चिन्हित आणि चिन्ह या संकल्पना सविस्तर मांडल्या आहेत. चिन्हक आणि चिन्हित, भाषिक व्यवस्था आणि वाचिक वर्तन, द्रव्य आणि आकार, अन्वयनिष्ठ व गणनिष्ठ संबंध, एककालिकता आणि कालक्रमिकता अशा पाच द्वंद्वात्मक संबंधांपैकी प्रस्तुत भाषांतरात पहिले दोन (चिन्हक आणि चिन्हित, भाषिक व्यवस्था आणि वाचिक वर्तन) सविस्तर समाविष्ट केले आहेत. प्रस्तुत भाषांतराच्या क्रमामध्ये हे पहिले प्रकरण शेवटी येते. तेव्हा प्रास्ताविकातील प्रकरणे दोन व तीन आधी आणि त्यानंतर पहिल्या भागातील प्रकरण एक असा क्रम येथे आढळेल.

## मराठी भाषांतर

### प्रकरण २

### भाषाविज्ञानाचा अभ्यासविषय व व्याप्ती, इतर विज्ञानांशी त्याचे संबंध

भाषाविज्ञानाचा अभ्यासविषय म्हणजे मानवाच्या समग्र वाचिक व्यवहाराचे सर्व मूर्त आविष्कार होत, मग हा व्यवहार जंगली समाजाचा असो वा सुसंस्कृत समाजाचा, किंवा तो इतिहासपूर्वकालीन असो वा अभिजातकालीन वा ऱ्हासकालीनही असो. प्रत्येक कालखंडातील केवळ शुद्ध व आलंकारिक वाचिक व्यवहाराचाच [भा१] विचार भाषावैज्ञानिकाने करायचा असतो असे नव्हे, तर इतर प्रकारचे आविष्कारही त्याने विचारात घ्यायचे असतात. केवळ इतकेच नव्हे तर समग्र वाचिक व्यवहाराचे प्रत्यक्ष निरीक्षण करणे अनेकदा शक्य नसल्याने त्याला लिखित संहितांचाही विचार करावा लागतो, कारण स्थलकालाच्या दृष्टीने दूरवर असणारे वाक्प्रचार त्याला या संहितांच्या आधारेच उपलब्ध होऊ शकतात.

भाषाविज्ञानाची व्याप्ती पुढीलप्रमाणे असायला हवी :

अ) ज्यांचे निरीक्षण शक्य आहे अशा सर्व भाषांच्या इतिहासाचा मागोवा घेणे व त्याची मांडणी करणे; म्हणजेच भाषाकुलांच्या इतिहासाचा मागोवा घेणे आणि शक्यतो प्रत्येक कुलाच्या भाषाजननीची पुनर्रचना करणे;

आ) सर्व भाषांमध्ये कायम व सार्वत्रिकपणे कोणती तत्त्वे कार्यरत असतात याची निश्चिती करणे आणि वैशिष्ट्यपूर्ण अशा सर्व ऐतिहासिक घटितांमागे कोणते सामान्य नियम असतात याची मांडणी करणे; आणि

इ) स्वतःची व्याप्ती निश्चित करून स्वतःची व्याख्या करणे.

भाषाविज्ञान इतर काही विज्ञानांशी जवळून संबंधित आहे. ही विज्ञाने भाषाविज्ञानाकडून काही वेळा पुराव्याची सामग्री उसनवार घेतात तर काही वेळा स्वतःची सामग्री भाषाविज्ञानाला पुरवितात. त्यांच्यामधील सीमारेषा नेहमीच अगदी स्पष्टपणे दिसतील असे नाही. उदा० वंशवर्णनपद्धती (ethnography) आणि पूर्व-इतिहास





अनुक्रमणिका

यांमध्ये भाषा केवळ एक पुरावासामग्री म्हणून वापरली जाते, व (त्यामुळे) भाषाविज्ञानाला या विज्ञानांपासून काळजीपूर्वक वेगळे काढणे आवश्यक ठरते. मानववंशविज्ञानामध्ये मानवाचा अभ्यास केवळ त्याच्या जीवजातीय गुणधर्मांच्या दृष्टिकोनातून केला जातो; उलट भाषा हे एक सामाजिक तथ्य असते. तेव्हा या विज्ञानापासूनही भाषाविज्ञानाला वेगळे काढणे आवश्यक ठरते. पण मग भाषाविज्ञानाला समाजविज्ञानाचा एक भाग मानायचे का? भाषाविज्ञान व सामाजिक मनोविज्ञान यांत कोणते संबंध आहेत? भाषेतील प्रत्येक गोष्टीला मूलतः मानसिक पैलू असतोच; ध्वनिपरिवर्तनांसारख्या भौतिक व यांत्रिक प्रक्रिया यांचाही यात अंतर्भाव होतो. भाषाविज्ञानाकडून सामाजिक मनोविज्ञानाला अत्यंत मूलभूत स्वरूपाची पुरावासामग्री पुरवली जाते; मग भाषाविज्ञान हे सामाजिक मनोविज्ञानाचे अविभाज्य अंग ठरत नाही का? येथे मी या प्रश्नांची थोडक्यात उत्तरे देणार आहे; आणि नंतर त्यांच्याकडे पुन्हा वळणार आहे.

भाषाविज्ञान आणि ध्वनींचा शरीरवैज्ञानिक अभ्यास यांच्यातील संबंधांची उकल करणे कमी अवघड आहे. यांच्यातील संबंध एकदिशात्मक आहे तो अशा अर्थाने की ध्वनींना शारीर कार्यांचा जो पैलू असतो [भा२] त्याच्याविषयीच्या स्पष्टीकरणांची गरज भाषेच्या अभ्यासाला भासते, परंतु याउलट मात्र कधी घडत नाही. (म्हणजे ध्वनींच्या शारीर कार्यात्मक अभ्यासाला भाषाविज्ञानाकडून मिळणाऱ्या स्पष्टीकरणांची गरज भासत नाही.) काही झाले तरी या दोन विज्ञानांमध्ये गल्लत होऊच शकत नाही. भाषिक चिन्हाच्या स्वनात्मक गुणधर्माशी भाषेच्या मूलभूत स्वरूपाचा काहीही संबंध नसतो, हे मी पुढे दाखवून देणार आहे.

वाङ्मयविद्या (philology) या ज्ञानक्षेत्राच्या बाबतीत सीमारेषा स्पष्टच आहेत : भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या ही ज्ञानक्षेत्रे अनेक ठिकाणी संबंधित असली व त्यांच्यात परस्परांत देवाण-घेवाण होत असली तरी ती दोन वेगळी क्षेत्रे आहेत.

अखेरचा प्रश्न म्हणजे भाषाविज्ञानाचा उपयोग काय? याविषयीची स्पष्टता फार लोकांपाशी नाही, व या प्रश्नाचा तपशीलवार खुलासा करण्याचे हे स्थळ नव्हे. मात्र काही गोष्टी अगदी उघड आहेत. उदा० संहितांवर काम करणाऱ्या सर्वच मंडळींना ह्र इतिहाससंशोधक, वाङ्मयविद्यासंशोधक इ० ह्र भाषिक प्रश्नांमध्ये रस असतो. याहूनही अधिक स्पष्ट असणारी गोष्ट म्हणजे सर्वसामान्य संस्कृतीच्या (अभ्यासाच्या) दृष्टीने भाषाविज्ञानाला फार महत्त्व आहे. व्यक्तींच्या व समाजांच्या जीवनामध्ये समग्र वाचिक व्यवहार सर्वांत महत्त्वाचा असतो. भाषाविज्ञान ही केवळ काही थोड्या विशेषज्ञांचीच मक्तेदारी असणे हे रास्त ठरणार नाही. या अभ्यासाशी प्रत्येक व्यक्ती या ना त्या प्रकारे संबंधित असते. परंतु भाषाविज्ञानाविषयीच्या या सर्वसामान्य आस्थेमुळेच एक विसंगती निर्माण होते : अर्थहीन संकल्पना, दुराग्रह, भ्रामक व चमत्कारिक कल्पना यांचा भाषाविज्ञानाच्या बाबतीत जेवढा बुजबुजाट झाला आहे तेवढा इतर कोणत्याही क्षेत्राच्या बाबतीत झालेला नाही. या चुका मनोविज्ञानाच्या दृष्टीने लक्षणीय ठरतील खऱ्या, पण या





अनुक्रमणिका

चुकांवर प्रहार करून त्यांची होईल तेवढी वासलात लावणे हे भाषावैज्ञानिकाचे प्रमुख कार्य होय.

## प्रकरण ३

## भाषाविज्ञानाची विषयवस्तू

### १. भाषेची व्याख्या

भाषाविज्ञानात नेमके कशाचे विश्लेषण केले जाते? भाषावैज्ञानिक अभ्यासाची खरी विषयवस्तू काय? हा प्रश्न विशेष अवघड आहे. का हे आपण नंतर बघूच. आधी केवळ या अवघडपणाचे स्वरूप लक्षात घेण्याचा प्रयत्न करू.

इतर विज्ञानांमध्ये विषयवस्तू आधीच निश्चित झालेल्या असतात व त्यांचा विचार वेगवेगळ्या दृष्टिकोनांतून करता येतो; भाषाविज्ञानाच्या बाबतीत तसे घडत नाही. समजा एखाद्या व्यक्तीने 'नू' ('उघडे', 'नग्न') हा फ्रेंच शब्द उच्चारला. वरवर पाहता या शब्दाला स्वतंत्रपणे उपलब्ध असणारी भाषिक वस्तू म्हणता येईल; परंतु अधिक काळजीपूर्वक तपासणी केली तर आपण जो दृष्टिकोन स्वीकारू त्यानुसार तीन-चार भिन्न गोष्टी उघड होत जातील; हा शब्द ध्वनी म्हणून, किंवा एखाद्या कल्पनेचे माध्यम म्हणून, किंवा लॅटीन 'नूदुम्'पासून साधित शब्द म्हणून, इत्यादी वेगवेगळ्या प्रकारे विचारात घेता येईल. दृष्टिकोनाआधीच ती वस्तू अस्तित्वात आहे, असे मुळीच म्हणता येणार नाही; उलट स्वीकारलेल्या दृष्टिकोनामुळे विषयवस्तू येथे निर्माण होते असे म्हणता येईल. शिवाय, यांपैकी एका दृष्टिकोनाला इतर दृष्टिकोनांपेक्षा श्रेष्ठ मानता येईल वा त्याला अग्रक्रम देता येईल असे आधीच ठरवण्याचा कोणताही मार्ग उपलब्ध नाही.

आणखी एक मुद्दा असा की आपण कोणताही दृष्टिकोन स्वीकारला तरी भाषिक घटितांना दोन परस्पर-संबंधित पैलू असतात व ते मूल्यांच्या दृष्टीने परस्परावलंबी असतात. उदाहरणार्थ,

१) उच्चारित स्वनावयव (articulated syllables) हे कानांनी ग्रहण केलेले श्रवणाच्या पातळीवरील ठसे असतात. परंतु हे ध्वनी उच्चारण-यंत्रणेशिवाय अस्तित्वातच येऊ शकत नाहीत. उदा० 'न' हा ध्वनी या दोन बाजूंच्या परस्परसंबंधामुळेच केवळ अस्तित्वात येऊ शकतो. समग्र वाचिक व्यवहार म्हणजे केवळ कानांना ऐकू येणारे ध्वनी असे आपण म्हणू शकत नाही. मौखिक उच्चारणे आणि ऐकू आलेले ध्वनी वेगळे काढता येणार नाहीत; उलटपक्षी उच्चारणेंद्रियांच्या हालचालींना श्रवणाच्या पातळीवरील ठशांपासून वेगळेही काढता येणार नाही.

२) परंतु समजा जरी आपण या स्वनात्मक द्वैताकडे दुर्लक्ष केले तरीही समग्र वाचिक व्यवहार हा स्वनात्मक तथ्ये म्हणून मानता येतो का, हा प्रश्न उरतोच. या प्रश्नाचे उत्तर नकारार्थी आहे. स्वन हे विचारांचे (म्हणजे त्यांच्या अभिव्यक्तीचे) केवळ माध्यम असते; त्यांना स्वत:चे असे स्वतंत्र अस्तित्व नसते. या ठिकाणी एक नवे व अत्यंत महत्त्वाचे असे

नाते विचारात घ्यावे लागते. ध्वनी म्हणजे एक श्राव्य-उच्चारित असा व्यामिश्र स्वरूपाचा एकक असतोच, आणि पुढे जाऊन त्याची जुळणी एका कल्पनेशी होत असते, व या जुळणीतून शारीर-मानसिक पातळीवर व्यामिश्र स्वरूपाचा आणखी एक एकक तयार होत असतो. अर्थात हे इथेच थांबत नाही;

३) समग्र वाचिक व्यवहाराला व्यक्तिनिष्ठ आणि सामाजिक अशा दोन बाजू असतात, आणि कोणत्याही एका बाजूची कल्पना दुसरीशिवाय करता येत नाही. आणखी पुढे जाता येईल;

४) समग्र वाचिक व्यवहारामध्ये दोन पैलू कोणत्याही एका क्षणी उपस्थित असतात : एक प्रस्थापित व्यवस्थेचा पैलू, तर दुसरा उत्क्रांतीचा पैलू. कोणत्याही एका क्षणी समग्र वाचिक व्यवहार ही एक वर्तमानात अस्तित्वात असणारी व्यवस्था असते आणि भूतकाळाची निष्पत्तीही असते. व्यवस्था व तिचा इतिहास, तिचे आजचे स्वरूप व तिचा भूतकाळ, यांमध्ये भेद करणे वरवर पाहता सोपे वाटते. परंतु हे दोन पैलू परस्परांशी इतक्या जवळून निगडित आहेत की त्यांना वेगळे काढणे वास्तविक पाहता फारच अवघड आहे. भाषिक घटितांच्या व्यक्तिनिष्ठ क्रमविकासाचा अभ्यास ह्न उदा० प्रारंभीच्या टप्प्यावर लहान मुलांच्या भाषेचा अभ्यास ह्न केला तर ही समस्या सोपी होईल का? तसे होणार नाही. कारण समग्र वाचिक व्यवहाराचा अभ्यास करताना आधीच्या टप्प्यावरील गुणधर्म हे स्थायी गुणधर्मापेक्षा वेगळे आहेत असे मानल्यास आपली पूर्ण दिशाभूल होईल आणि या दुष्टचक्रातून आपली सुटका होणार नाही.

आपण कोणत्याही दृष्टिकोनातून या समस्येचा विचार करू लागलो तरी भाषाविज्ञानाची एकच एक विषयवस्तू आपसुकपणे आपल्या हाती कोठेही लागत नाही [भा३]. प्रत्येक ठिकाणी आपल्यासमोर शृंगापत्तीच उभी राहते. समस्येच्या एकाच बाजूवर लक्ष केंद्रित केले तर आपण वर जी द्वंद्वे उल्लेखिली आहेत ती आपल्या नजरेतून सुटण्याचाच धोका उद्भवतो; उलटपक्षी, समग्र वाचिक व्यवहाराचा विचार एकाच वेळी अनेक दृष्टिकोनांतून करायचा म्हटले तर भाषाविज्ञानाची विषयवस्तू ही मूलतः विभिन्न स्वरूपाच्या परस्पर-असंबंधित गोष्टींचा एक गोंधळ बनून राहते. या दोहोंपैकी प्रत्येक अभ्यासपद्धतीमधून अनेक विज्ञानांची दारे उघडतात ह्न मनोविज्ञान, मानववंशविज्ञान, आदेशात्मक व्याकरण, वाङ्मयविद्या इ० ही सर्व विज्ञाने भाषाविज्ञानाहून वेगळी आहेत, मात्र समग्र वाचिक व्यवहार ही आपल्या विषयवस्तूंपैकीच एक आहे असा दावा ही विज्ञाने करू शकतात, परंतु त्यांच्या अभ्यासपद्धती मात्र (भाषाविज्ञानाच्या दृष्टीने) अप्रस्तुत ठरतात.

या सर्व अडचणींवर माझ्या दृष्टीने एकच उतारा आहे : भाषावैज्ञानिकाने आपले प्राथमिक लक्ष्य म्हणून भाषिक व्यवस्थेचा अभ्यास हाती घ्यायला हवा आणि समग्र वाचिक व्यवहाराच्या इतर सर्व आविष्कारांचा संबंध या (भाषिक व्यवस्थेच्या) अभ्यासाशी जोडायला हवा. वास्तविक, द्वैतभावांच्या या गलबल्यात भाषिक व्यवस्था या एकाच





अनुक्रमणिका

गोष्टीची स्वतंत्रपणे व्याख्या देता येते आणि मानवी बुद्धीला तिचे समाधानकारकपणे आकलन होऊ शकते.

असे असले तर मग भाषिक व्यवस्था (लांग) म्हणजे तरी काय? माझ्या मते केवळ समग्र वाचिक व्यवहार म्हणजे भाषिक व्यवस्था नव्हे. भाषिक व्यवस्था हा समग्र वाचिक व्यवहाराचा केवळ एक भाग आहे, मात्र तो अत्यंत सत्त्वभूत असा भाग आहे. समग्र वाचिक व्यवहारामागची व्यवस्था ही आपल्या भाषाशक्तीचे सामाजिक फलित असते [भा४]. त्याबरोबरच भाषिक व्यवस्थेला आणखी एक अंग असते; ते म्हणजे, समाजातील व्यक्तींना ज्याद्वारे आपली भाषाशक्ती वापरता येईल अशा आवश्यक संकेतांचा एक संच. साकल्याने विचार करता समग्र वाचिक व्यवहाराला वेगवेगळे व मूलतः विभिन्न पैलू आहेत. विविध ज्ञानक्षेत्रांना वेगळ्या करणाऱ्या सीमांवर एकाच वेळेस हा समग्र वाचिक व्यवहार पाय रोवून असतो. एकाच वेळी तो भौतिकविज्ञान, शरीरकार्य-विज्ञान आणि मनोविज्ञान यांचा विषय आहे. त्याचा संबंध व्यक्ती आणि समाज या दोघांशीही आहे. मानवी घटितांचे कोणतेही वर्गीकरण करून समग्र वाचिक व्यवहाराला एकच एक स्वतंत्र अशी जागा मिळणार नाही, कारण त्याला तसे व्यवच्छेदक एकत्वही नाही.

याउलट, भाषिक व्यवस्था ही स्वयंपूर्ण असते आणि वर्गीकरणाचे एक तत्त्व म्हणूनही ती वावरते. समग्र वाचिक व्यवहारामध्ये भाषिक व्यवस्थेला अग्रक्रम दिला की आपण धूसर अशा क्षेत्रामध्ये एक नैसर्गिक व्यवस्था निर्माण करतो आणि या क्षेत्राच्या अन्य प्रकारच्या वर्गीकरणाला आपोआपच खीळ बसते.

भाषिक व्यवस्थेला वर्गीकरणाचे एक तत्त्व मानण्यावर एक आक्षेप येऊ शकतो : समग्र वाचिक व्यवहार हा एका निसर्गदत्त शक्तीच्या साहाय्याने चालू असतो, तर भाषिक व्यवस्था ही संकेतनिष्ठ असते व ती आत्मसात करून घ्यावी लागते, व त्यामुळे भाषिक व्यवस्थेला निसर्गदत्त शक्तीपेक्षा जास्त महत्त्व द्यायला हवे.

या आक्षेपाला खालीलप्रमाणे उत्तर देता येईल :

एक म्हणजे आपल्या प्रत्यक्ष बोलण्यातून समग्र वाचिक व्यवहाराचे जे कार्य व्यक्त होते ते पूर्णपणे नैसर्गिक असते असे सिद्ध झालेले नाही ह्व म्हणजेच आपले पाय जसे चालण्यासाठी असतात तशी वागिंद्रिये बोलण्यासाठी निसर्गाकडून प्राप्त झालेली आहेत, हे सिद्ध झालेले नाही. भाषावैज्ञानिकांचे या मुद्यावर अजिबात एकमत नाही. उदा० व्हिटनीच्या [भा५] मते भाषा ही अनेक समाजव्यवस्थांपैकी एक व्यवस्था असते व भाषेसाठी वागिंद्रियांचा वापर होणे ही गोष्ट पूर्णपणे योगायोगाने घडून आलेली आहे; केवळ सोय म्हणूनच या इंद्रियांचा वाचिक व्यवहारासाठी वापर होतो. ध्वनिरूप चिन्हांऐवजी मानवाला हावभाव आणि दृश्यचिन्हांचा वापरही सहज करता आला असता. आता हा युक्तिवाद दुराग्रही स्वरूपाचा आहे यात शंकाच नाही; भाषा ही सर्वच बाबतीत इतर सामाजिक व्यवस्थांसारखी नाही. शिवाय, वागिंद्रिये योगायोगाने वापरात आली हा व्हिटनी याचा दावा फार टोकाचा आहे. वागिंद्रियांचा वापर निसर्गाने आपल्यावर लादला असेच

म्हणायला हवे. मात्र या अमेरिकन भाषावैज्ञानिकाचा मुख्य मुद्दा अचूक आहे. तो म्हणजे, आपला समग्र वाचिक व्यवहार हा एक संकेत असतो आणि स्वीकारलेल्या चिन्हाचे नेमके स्वरूप काय ही बाब अप्रस्तुत असते. समग्र वाचिक व्यवहाराच्या समस्येच्या संदर्भात वागिंद्रियांचा प्रश्न दुय्यम स्वरूपाचाच ठरतो.

उच्चारित वाचिक व्यवहाराच्या एका संकल्पनेमुळे वरील (व्हिटनीविरुद्ध केलेल्या) युक्तिवादाला पुष्टी मिळू शकेल. लॅटीनमध्ये 'आर्टिक्युलस' म्हणजे एखाद्या क्रमवारीचा सदस्य-घटक, भाग वा उपविभाग होय. ही व्याख्या वाचिक व्यवहाराला लावली तर उच्चारण म्हणजे एक तर उच्चारित क्रमाचे अक्षर-अवयवांत झालेले विभाजन असू शकते किंवा अर्थपूर्ण एककांच्या अर्थक्रमांची झालेली विभागणी असू शकते; जर्मनमध्ये गिग्लिअडेर्ट श्प्राखऽ (gegliederte Sprache) ही संज्ञा दुसऱ्या अर्थाने वापरली जाते. ही दुसरी व्याख्या वापरून असे म्हणता येईल की मानवाला प्राप्त झालेली निसर्गदत्त शक्ती म्हणजे उच्चारित वाचिक व्यवहार करण्याची शक्ती नव्हे, तर भाषिक व्यवस्था रचण्याची शक्ती. म्हणजे वेगवेगळ्या कल्पनांची वेगवेगळ्या चिन्हांशी सांगड घालून व्यवस्था निर्माण करण्याची शक्ती होय.

वाचाशक्तीचे स्थान मेंदूच्या डाव्या अग्रभागातील तिसऱ्या ललाटपालीमध्ये (third left frontal lobe) असते असा शोध ब्रोका या वैज्ञानिकाने लावला. वाचिक व्यवहार ही निसर्गदत्त देणगी असते, या युक्तिवादाला पुष्टी देण्यासाठी हा पुरावा वापरला गेला आहे. परंतु आपल्याला हेही ठाऊक आहे की वाचिक व्यवहाराशी संबंधित असणारी प्रत्येक गोष्ट, लेखनसुद्धा, मेंदूच्या याच भागात केंद्रित झालेले असते. याचबरोबर मेंदूतील विशिष्ट वाचाकेंद्रांना झालेल्या दुखापतीमुळे निर्माण झालेल्या विविध प्रकारच्या वाचाभंगाच्या अनेक उदाहरणांमधून पुढील गोष्टी स्पष्ट होतात :

(१) उच्चारित वाचिक व्यवहारामध्ये निर्माण होणारे विविध प्रकारचे दोष हे लिखित व्यवहाराशी अनेक प्रकारे जोडलेले असतात; आणि (२) वाचाभंग (aphasia) वा लेखनभंग (agraphia) यांच्या सर्व उदाहरणांमध्ये जिची हानी होत असते ती शक्ती म्हणजे एखादा विशिष्ट ध्वनी उच्चारण्याची वा विशिष्ट अक्षर लिहिण्याची शक्ती नसते तर वाचिक व्यवहारातील चिन्हांचा, मग ती उच्चारित असोत वा लिखित, वापर करण्याची शक्ती असते. विशिष्ट इंद्रियांच्या कार्यापलीकडे चिन्हांचे नियंत्रण करणारी एक सामान्य अशी शक्ती (वाचिक व्यवहारामागे) असते व हीच खरी भाषाशक्ती होय असा याचा स्पष्ट अर्थ आहे. तेव्हा, यातून पुन्हा आपण त्याच वरील निष्कर्षाप्रत येतो.

वाचिक व्यवहाराच्या अभ्यासामध्ये भाषिक व्यवस्थेला अग्रक्रम द्यायला हवा यासाठी आणखी एक युक्तिवाद अखेरीस मांडता येईल. शब्दांचे उच्चारण करण्याची शक्ती - मग ती निसर्गदत्त असो वा नसो - ही वापरात येते ती समाजसमूहाने निर्माण केलेल्या आणि उपलब्ध करून दिलेल्या साधनयंत्रणेद्वारेच येते. तेव्हा भाषिक व्यवस्था हीच वाचिक व्यवहाराला एकात्म स्वरूप देत असते, असे म्हणणे अर्थहीन ठरत नाही.

## २. भाषिक संरचना : समग्र वाचिक व्यवहाराच्या तथ्यांच्या पसाऱ्यातील तिचे स्थान

समग्र वाचिक व्यवहाराच्या पसाऱ्यामधून भाषिक व्यवस्थेचा भाग वेगळा काढण्यासाठी बोलण्याच्या विशिष्ट क्रियेची तपासणी आपल्याला करायला हवी व त्यातून वाचिक वर्तनाच्या चक्राकार प्रक्रियेची पुनर्मांडणी करायला हवी. बोलण्याच्या प्रक्रियेत किमान दोन व्यक्ती आवश्यक असतात; चक्र पूर्ण होण्यासाठी किमान दोन ही संख्या आवश्यक आहे. समजा क्ष आणि य अशा दोन व्यक्ती परस्परांशी संभाषण करीत आहेत.



क्ष य

बोलण्याच्या मंडल-प्रक्रियेचा प्रारंभ 'क्ष'च्या मेंदूपासून होतो, असे मानू. येथे मानसिक तथ्ये (यांना आपण संकल्पना म्हणू) आणि त्यांच्या आविष्कारासाठी वापरल्या जाणाऱ्या भाषिक चिन्हांची किंवा स्वनात्मक आकृतिबंधांची (मनातील) प्रतिरूपे यांच्यात सांगड घातलेली असते. 'क्ष'च्या मेंदूमध्ये विशिष्ट संकल्पनांची सांगड भाषिक ध्वनींच्या प्रतिरूपणांशी (म्हणजेच स्वनप्रतिमांशी) घातली गेलेली असते. मेंदूमध्ये ('क्ष'ची बोलण्याची क्रिया सुरू होताना) विशिष्ट संकल्पनेशी निगडित असणारी स्वनप्रतिमा चेतवली जाते. ही प्रक्रिया पूर्णपणे मानसिक असते. या पूर्णपणे मानसिक प्रक्रियेनंतर एक शरीरनिबद्ध प्रक्रिया घडून येते : मेंदूमधून त्या विशिष्ट स्वनात्मक आकृतिबंधाशी संबंधित असा संदेश वागिंद्रियांकडे पाठविला जातो. तसे झाल्यावर (म्हणजे ध्वनीचे उच्चारण झाल्यावर) ध्वनिलहरी क्षच्या मुखापासून यच्या कानापर्यंत प्रवास करतात : ही प्रक्रिया पूर्णपणे भौतिक स्वरूपाची असते. पुढची पायरी म्हणजे ही मंडल-प्रक्रिया आता 'य'मध्ये चालू राहते, परंतु येथे क्रम उलटा होतो : कानापासून मेंदूपर्यंतच्या प्रवासाची शरीरनिबद्ध प्रक्रिया प्रथम घडते. आणि नंतर मेंदूमध्ये स्वनात्मक आकृतिबंधाशी, योग्य त्या संकल्पनेशी सांगड घालण्याची मानसिक प्रक्रिया घडत असते. त्यानंतर 'य' ही व्यक्ती जर बोलू लागली तर एक नवीन क्रिया घडते; ही 'य'च्या मेंदूपासून सुरू होऊन 'क्ष'च्या मेंदूत संपते. हुबेहूब वर उल्लेखिलेल्या पहिल्या क्रियेसारखीच ही क्रिया असते व तिचे टप्पे व त्यांचा क्रमही सारखाच असतो. ही क्रिया पुढील आकृतीमध्ये दर्शविली आहे.

---





अनुक्रमणिका




सं - संकल्पना, ध्व - ध्वनि-प्रतिमा

हे वर दिलेले विश्लेषण परिपूर्ण आहे असा दावा नाही. श्राव्य संवेदनेला वेगळे काढता येईल, या संवेदनेची अस्फुट स्वनात्मक आकृतिबंधाशी होणारी जुळणी शोधता येईल, उच्चारणाची स्नायुगत प्रतिमा यांना बाजूला काढता येईल इ० मी फक्त अत्यावश्यक मानल्या गेलेल्या घटकांचाच अंतर्भाव केलेला आहे. परंतु आकृतीवरून एका दृष्टिक्षेपातच भौतिक/वस्तुगत (ध्वनि-लहरी), शारीरिक (श्रवण व उच्चारण) आणि मानसिक (शब्दप्रतिमा व संकल्पना यांचे स्वनात्मक आकृतिबंध) या पैलूंमधील भेद ताबडतोब लक्षात येतो. अर्थात, शब्दांचे स्वनात्मक आकृतिबंध आणि प्रत्यक्ष ध्वनी यांत गोंधळ होऊ देता कामा नये. शब्दांचे स्वनात्मक आकृतिबंध हे मानसिक पातळीवर अस्तित्वात असतात. तीच गोष्ट त्यांच्याशी निगडित असणाऱ्या संकल्पनाच्या बाबतीतही खरी आहे.

मी वर काढलेल्या मंडलाची उपविभागणी पुढीलप्रमाणे करता येते :

अ) मुखापासून कानापर्यंत जाणाऱ्या ध्वनि-लहरींनी बनलेला बाह्य भाग आणि इतर सर्व गोष्टी समाविष्ट असणारा अंतर्भाग;

आ) एक मानसिक व दुसरा अ-मानसिक भाग; अ-मानसिक भागामध्ये वागिंद्रियांमध्ये वसणारी शारीर तथ्ये आणि व्यक्तीच्या बाहेर असणारी भौतिक तथ्ये या दोहोंचा समावेश होतो;

इ) एक क्रियाशील व दुसरा अ-क्रियाशील भाग : बोलणाऱ्या व्यक्तीच्या (मेंदूतील) साहचर्य-केंद्रापासून ऐकणाऱ्या व्यक्तीच्या कर्णापर्यंत जाणारे सर्वकाही क्रियाशील म्हणता येईल, तर ऐकणाऱ्या व्यक्तीच्या कर्णापासून तिच्या (मेंदूतील) साहचर्य-केंद्रापर्यंत जाणारा सर्व भाग अ-क्रियाशील म्हणता येईल;

ई) अखेरीस मंडलाच्या मानसिक भागामधील कार्यशील भागात असणारे सर्वकाही उच्चारणात्मक/कार्यात्मक असते (सं --> ध्व), तर त्यामधील अकार्यशील भागातील





अनुक्रमणिका

सर्वकाही ग्रहणात्मक (ध्व --> सं) असते.

आणखी असे की सुट्या चिन्हांच्या पलीकडे आपण गेलो की लगेच साहचर्यात्मक व जुळणी करणारी शक्ती येथे गृहीत धरावी लागते. एक चिन्हव्यवस्था म्हणून भाषेची संरचना करण्यामध्ये ही शक्ती मुख्यत: कार्यरत असते.

परंतु या साहचर्य व जुळणी करणाऱ्या शक्तीचे कार्य स्पष्टपणे ध्यानात येण्यासाठी समग्र वाचिक व्यवहाराचे केवळ बीजरूप असणारे व्यक्तिगत वाचिक कृत्य मागे सोडून सामाजिक घटिताकडे यावे लागते.

समग्र वाचिक व्यवहाराने जोडल्या जाणाऱ्या सर्व सुट्या व्यक्तींमधून एक सरासरी नमुना निश्चित होत असतो : सर्व व्यक्ती चिन्हे व संकल्पना यांची एकाच तऱ्हेची जुळणी साधत असतात. अर्थात ही जुळणी अगदी सारखी नसली तरी जवळ-जवळ सारखी असते.

भाषिक व्यवस्थेच्या सामाजिक दृढीकरणाचे (crystalization) मूळ काय? मंडलामधील नेमके कोणते भाग यात कार्यरत असतात? सगळेच भाग सारख्या प्रमाणात भाग घेत नसतात, हे निश्चित.

भौतिक (अ-मानसिक) भाग लगेच आपल्या चर्चेच्या कक्षेतून वगळता येतील. आपल्याला येत नाही अशी भाषा लोक बोलत असताना आपण ऐकतो तेव्हा आपण ध्वनी ऐकतो, परंतु आपण सामाजिक वास्तवाच्या बाहेरच राहतो, कारण आपल्याला ते ध्वनी समजत नाहीत.

मात्र (सामाजिक दृढीकरणाच्या प्रक्रियेमध्ये) या मंडलाचा मानसिक पैलू पूर्णपणे गुंतलेला नसतो. या मानसिक पैलूची जी कार्यात्मक बाजू असते तिला या सामाजिक दृढीकरणाच्या प्रक्रियेमध्ये काहीही स्थान नसते. कारण उच्चारण (कार्यात्मक बाजू) हे कधीही सामूहिकपणे केले जात नाही. उच्चारण हे नेहमी व्यक्तीद्वारेच होत असते आणि त्यावर व्यक्तीचे पूर्ण नियंत्रण असते. या उच्चारणात्मक बाजूला मी 'वाचिक वर्तन' असे संबोधणार आहे.

ग्रहणात्मक आणि संयोजनात्मक शक्तींच्या द्वारे बोलणाऱ्या व्यक्तींच्या मनावर जे ठसे उमटतात ते सर्व व्यक्तींसाठी जवळजवळ सारखेच असतात. भाषिक व्यवस्था इतर सर्व गोष्टींपासून वेगळी काढून तिची एक सामाजिक वस्तू म्हणून कल्पना कशी करता येईल? भाषिक व्यवस्था ही सामाजिक बंधांची बनलेली असते आणि सर्व व्यक्तींच्या मनात साठवलेल्या ज्या शब्द-प्रतिमा असतात त्या सर्व प्रतिमांना आपण एकत्र आणू शकलो तर हा सामाजिक बंध आपल्याला प्रस्थापित करता येईल. एखाद्या विशिष्ट समाजगटाच्या सदस्यांनी प्रत्यक्ष वाचिक वर्तन करताना तयार केलेले हे एक भांडारच असते; प्रत्येक व्यक्तीच्या मेंदूमध्ये किंबहुना अधिक नेमकेपणे बोलायचे झाल्यास त्या समाजगटातील प्रत्येक व्यक्तीच्या मेंदूमध्ये या व्याकरणिक व्यवस्थेचे सुप्त अस्तित्व असते (potential

existence), कारण कोणत्याही एका व्यक्तीमध्ये भाषिक व्यवस्था पूर्णपणे असू शकत नाही; सामूहिकतेमध्येच ती पूर्णत्वाने अस्तित्वात असते.

भाषिक व्यवस्थेला वाचिक वर्तनापासून वेगळे काढल्यामुळे एकाच वेळी दोन प्रकारचे भेद शक्य होतात : (१) सामाजिक आणि व्यक्तिगत यांतील भेद; आणि (२) सत्त्वभूत घटक व आनुषंगिक व बव्हंशी योगायोगाने अस्तित्वात असणारे घटक यांतील भेद.

भाषिक व्यवस्था ही बोलणाऱ्या व्यक्तीवर अवलंबून नसते. व्यक्तीमध्ये (म्हणजे तिच्या मनात वा मेंदूत) ती आपोआपच जमा झालेली असते. तिला पूर्वविचाराची कधीही आवश्यकता नसते; केवळ भेदव्यवस्थेच्या कार्यासाठीच विचाराची/चिंतनाची आवश्यकता असते व याचा विचार आपण नंतर करू.

याउलट वाचिक वर्तन ही एक व्यक्तिगत कृती असते. ती ऐच्छिक व बौद्धिक स्वरूपाची असते. या कृतीमध्ये आपण पुढील भेद केला पाहिजे : (१) स्वत:चे विचार व्यक्त करण्यासाठी भाषिक व्यवस्थेचा वापर करणाऱ्या जुळण्या; आणि (२) या जुळण्यांची बाह्य अभिव्यक्ती करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या मानसिक-भौतिक यंत्रणा.

मी शब्दांची व्याख्या देत नसून मी वस्तूंची व्याख्या देतो आहे, हे ध्यानात घ्यायला हवे. वेगवेगळ्या भाषांमध्ये सारखेच अर्थ नसणारे काही संदिग्ध शब्द असतात; उदाहरणार्थ, जर्मन 'श्प्राखऽ' (Sprache) याचा अर्थ भाषिक व्यवस्था व समग्र वाचिक व्यवहार असा दोन्ही होतो. 'रीड' (Rede) याचा अर्थ जवळजवळ 'वाचिक वर्तन' असा होतो, परंतु त्याचबरोबर 'संभाषित' (discourse) असाही अर्थ त्याला चिकटलेला आहे. लॅटीन 'सर्मो' (sermo) म्हणजे समग्र वाचिक व्यवहार तसेच (व्यक्तिगत) वाचिक वर्तन, तर 'लिंग्वा' (lingua) म्हणजे 'भाषिक व्यवस्था', इत्यादी. आपण वर ज्या संकल्पनांची चर्चा केली आहे त्यांचा नेमकेपणाने निर्देश करणारे शब्द नाहीत; त्यामुळेच शब्दांच्या नेमक्या व्याख्या देण्याचा उद्योग निष्फळ ठरतो; वस्तूंच्या व्याख्या देताना शब्दांपासून सुरुवात करणे ही चुकीची पद्धत आहे.

भाषिक व्यवस्थेचे गुणधर्म सारांशरूपाने पुढीलप्रमाणे :

(१) समग्र वाचिक व्यवहाराची तथ्ये ही बहुजिनसी स्वरूपाची गोष्ट असते; त्यामध्ये भाषिक व्यवस्था ही एक सुनिश्चित वस्तू असते. बोलण्याच्या क्रियेच्या मंडलामधील एका मर्यादित भागामध्ये भाषिक व्यवस्था केंद्रीभूत झालेली (localized) असते असे मानता येते, व या भागात श्राव्य-प्रतिमा व संकल्पना यांची जुळणी होत असते. समग्र वाचिक व्यवहाराचे सामाजिक अंग म्हणजे भाषिक व्यवस्था होय; ती व्यक्तीच्या पलीकडची असते व कुणीही व्यक्ती स्वत:हून तिची निर्मिती करू शकत नाही वा तिच्यात बदलही घडवू शकत नाही. एखाद्या समाजगटातील सभासदव्यक्तींनी जणू एखादा करार केल्यामुळेच भाषिक व्यवस्था अस्तित्वात असू शकते. शिवाय भाषिक व्यवस्थेचे कार्य शिकून घेण्यासाठी प्रत्येक व्यक्तीला उमेदवारी करावीच लागते; प्रत्येक लहान मूल ही व्यवस्था पायरी-पायरीने आत्मसात करीत जाते. भाषिक व्यवस्था ही गोष्ट इतकी सुनिश्चित असते की एखादी व्यक्ती

वाचिक वर्तनापासून (म्हणजे प्रत्यक्ष उच्चारणापासून) वंचित राहूनही ऐकू येणारी वाचिक चिन्हे तिला समजत असतील तर तिची भाषिक व्यवस्था टिकून असते असे म्हणता येते.

(२) भाषिक व्यवस्थेचा अभ्यास आपण स्वतंत्रपणे करू शकतो; वाचिक वर्तनाच्या बाबतीत ते शक्य नसते. मृत भाषा आज बोलल्या जात नसल्या तरी त्यांच्या संरचनांचा परिचय आपण उत्तम प्रकारे करून घेऊ शकतो. समग्र वाचिक व्यवहारातील इतर घटकांना बाजूला सारता येणे शक्य असते. खरे म्हणजे हे इतर घटक वगळले तरच भाषिक संरचनेचा अभ्यास करणारे भाषेचे विज्ञान शक्य होईल.

(३) समग्र वाचिक व्यवहार हा बहुजिनसी असतो तर वर व्याख्या दिल्यानुसार भाषिक व्यवस्था ही एकजिनसी स्वरूपाची असते. भाषिकव्यवस्था ही एक चिन्हव्यवस्था असते; अर्थ व ध्वनिप्रतिमा यांची जुळणी हेच तिच्यात सत्त्वभूत असते; आणि चिन्हाची ही दोन्ही अंगे (चिन्हक आणि चिन्हित) मानसिक स्वरूपाची असतात.

(४) वाचिक वर्तन जेवढे मूर्त असते, तेवढीच भाषिक व्यवस्थाही मूर्त असते; आणि त्यामुळेच तिचाही अभ्यास शक्य होतो. भाषिक चिन्हे ही मूलतः मानसिक स्वरूपाची असली तरी ती अमूर्तीकरणे नसतात. सामुदायिक सहमती असणाऱ्या जुळण्या असे भाषिक चिन्हांचे स्वरूप असते व चिन्हांची मिळून भाषिक व्यवस्था बनलेली असते; मेंदूमध्ये स्थान असणारी ही चिन्हे वास्तव स्वरूपाची असतात. शिवाय, भाषिक चिन्हे ही संवेद्य (टँजिबल) असतात. भाषिक चिन्हांचे रूपांतर सांकेतिक लेखी प्रतीकांमध्ये करता येते. याउलट प्रत्यक्ष वाचिक वर्तनाची तपशीलवार छायाचित्रे घेणे अशक्यच आहे; अगदी लघुतम शब्दाच्या उच्चारणामध्येही स्नायूंच्या अगणित हालचाली होत असतात आणि त्यांना चित्रमय स्वरूप देणे अत्यंत जिकिरीचे असते. याउलट भाषिक व्यवस्थेमध्ये फक्त ध्वनिप्रतिमा असते व तिला दृश्य प्रतिमेमध्ये बद्ध करणे शक्य असते. प्रत्यक्ष वाचिक वर्तनामध्ये ध्वनिप्रतिमा मूर्त रूपात अवतरण्यासाठी होणाऱ्या शारीरिक हालचालींची संख्या फार मोठी असते; या सर्व हालचालींकडे दुर्लक्ष केले की आपल्याला असे दिसून येते की प्रत्येक ध्वनिप्रतिमा म्हणजे दुसरे-तिसरे काही नसून संख्येने मर्यादित अशा काही मूलघटकांची वा स्वनिमांची एक गोळाबेरीज असते; तसेच लेखी चिन्हांची तेवढीच संख्या वापरून त्यांना चिन्हांकितही करता येते. भाषिक व्यवस्थेशी संबंधित असणाऱ्या घटकांना चित्ररूप देता येणे शक्य असते व त्यामुळेच शब्दकोश व व्याकरणे यांच्याद्वारे या व्यवस्थेचे अचूकपणे प्रतिरूपण करणेही शक्य असते, कारण भाषिक व्यवस्था म्हणजे ध्वनिप्रतिमांचे भांडार, आणि लेखन म्हणजे या प्रतिमांना मिळालेले संवेद्य (दृश्य) रूप होय.

### ३. मानवी तथ्यांच्या संदर्भात भाषिक व्यवस्थेचे स्थान : चिन्हमीमांसा

भाषिक व्यवस्थेच्या वर उल्लेखिलेल्या गुणधर्मांमधूनच एक अधिक महत्त्वाचा गुणधर्म (आपोआप) उघड होतो. समग्र वाचिक पुरावासामग्रीमधून भाषिक व्यवस्थेच्या रूपरेषा निश्चित झाल्या की या व्यवस्थेला मानवी घटितांच्या वर्गामध्ये टाकता येते; समग्र वाचिक व्यवहाराच्या बाबतीत तसे करता येत नाही.

आपण आताच असे पाहिले की भाषिक व्यवस्था ही एक सामाजिक संस्था असते; परंतु अनेक घटकांमुळे तिला इतर राजकीय, कायदेविषयक इ० संस्थांपासून वेगळे काढता येते. भाषिक व्यवस्थेच्या अनन्य स्वरूपावर प्रकाश टाकण्यासाठी तथ्यांचा एक वेगळा वर्ग लक्षात घेणे आवश्यक आहे.

भाषिक व्यवस्था ही विचार व्यक्त करणाऱ्या चिन्हांची एक व्यवस्था असते आणि त्यामुळे लेखनव्यवस्था, मूकबधिरांची चिन्हव्यवस्था, प्रतीकात्मक विधिकांडे, औपचारिक वर्तनाचे साचे (नमस्कार-चमत्कार), सैनिकी चिन्हव्यवस्था इत्यादी व्यवस्थांशी तिची तुलना करता येते. मात्र या सर्व व्यवस्थांमधील ती सर्वांत महत्त्वाची व्यवस्था असते.

समाजामध्ये चिन्हांचे जे अस्तित्व असते त्याचा अभ्यास करणाऱ्या विज्ञानाची कल्पना करता येणे शक्य आहे; सामाजिक मनोविज्ञानाची, व त्यामुळे सामान्य मनोविज्ञानाची, ती एक शाखा असेल. मी या विज्ञानाला 'चिन्हमीमांसा'(सेमिऑलॉजि)[३] असे नाव देईन (ग्रीक semeion म्हणजे 'चिन्ह' यापासून). चिन्हे कशाची बनलेली असतात, त्यांना नियंत्रित करणारे नियम कोणते, याची उत्तरे चिन्हमीमांसेत मिळतील. हे विज्ञान अजून जन्माला यायचे आहे, व त्यामुळे त्याचे निश्चित स्वरूप काय असेल हे कोणालाही सांगता येणार नाही; मात्र या विज्ञानाला अस्तित्वात असण्याचा अधिकार जरूर आहे; त्याचे स्थान आधीच निश्चित झालेले आहे. चिन्हमीमांसा या सर्वसामान्य विज्ञानाची भाषाविज्ञान ही केवळ एक शाखा आहे; चिन्हमीमांसेमध्ये हाती लागणारे नियम भाषाविज्ञानालाही लागू पडतील; आणि मानवी तथ्यांच्या गोळाबेरजेमधून एक आखीव-रेखीव क्षेत्र भाषाविज्ञानामुळे निश्चित होईल.

चिन्हमीमांसेचे निश्चित स्थान ठरवून देणे ही जबाबदारी मनोवैज्ञानिकांची आहे[४]. चिन्हात्मक पुरावासामग्रीच्या गोळाबेरजेमधून भाषिक व्यवस्था ही एक सुनिश्चित व्यवस्था कशी ठरते हे शोधून काढण्याची जबाबदारी भाषावैज्ञानिकाची आहे. हा मुद्दा आपण पुन्हा नंतर चर्चेसाठी घेऊ. येथे मला केवळ एका गोष्टीकडे लक्ष वेधायचे आहे : भाषाविज्ञानाला विज्ञानांच्या वर्गामध्ये स्थान मिळवून देण्यात मी यशस्वी झालो असलो तर त्याचे कारण मी भाषाविज्ञानाचा संबंध चिन्हमीमांसेशी जोडलेला आहे, हे आहे.

इतर साऱ्या विज्ञानांप्रमाणे स्वत:चा विषय असणारे एक स्वतंत्र विज्ञान म्हणून चिन्हमीमांसेला अजून मान्यता का प्राप्त झालेली नाही? भाषावैज्ञानिक या मुद्यावर चक्रापत्तींमध्ये सापडले आहेत. इतर कशाहीपेक्षा भाषिक व्यवस्थेमुळे चिन्हविषयक समस्यांच्या आकलनाला मजबूत पाया मिळू शकतो; परंतु अचूकपणे बोलायचे झाल्यास भाषिक व्यवस्थेचा अभ्यास इतर कोणताही हेतू समोर न ठेवता करावा लागतो; आजवर भाषिक व्यवस्थेचा जो अभ्यास झालेला आहे तो जवळजवळ सगळा अभ्यास अन्य काही गोष्टींच्या संदर्भात, अन्य दृष्टिकोनांतून झालेला आहे.

यापैकी पहिला दृष्टिकोन म्हणजे सर्वसामान्य जनतेचा वरवरचा दृष्टिकोन होय : भाषिक व्यवस्था म्हणजे केवळ एक नामकरण व्यवस्था असे मानण्यापलीकडे सर्वसामान्य लोकांची

मजल जात नाही व त्यामुळे भाषिक व्यवस्थेच्या अस्सल स्वरूपाचा शोध घेण्यात अडथळाच निर्माण होतो.

मनोवैज्ञानिकांचा दृष्टिकोन वेगळा असतो; त्यांना व्यक्तीमधील चिन्ह-यंत्रणेचा अभ्यास करायचा असतो, ही अगदी सोपी पद्धती आहे, परंतु व्यक्तिगत उच्चारणाच्या पलीकडे जाऊन सामाजिक स्वरूप असणाऱ्या चिन्हांपर्यंत ही पद्धती पोचू शकत नाही.

किंवा चिन्हांचा अभ्यास सामाजिक दृष्टिकोनातून करताना भाषेला इतर सामाजिक संस्थांशी जोडणाऱ्या गुणधर्मांवर भर दिला जातो. व हे गुणधर्म बऱ्हंशी ऐच्छिक स्वरूपाचे असतात. त्यामुळे (चिन्हमीमांसेचे व भाषाविज्ञानाचे) उद्दिष्ट बाजूलाच राहते आणि सर्वसामान्य चिन्हव्यवस्थांचे त्याचप्रमाणे भाषेचे खास गुणधर्म पूर्णपणे दुर्लक्षितच राहतात. चिन्हाचा खास स्वत:चा असा एक गुणधर्म असतो, मात्र निदान सकृतदर्शनी तो ध्यानात येणारा नसतो; हा गुणधर्म व्यक्तिगत वा सामाजिक इच्छाशक्तीच्या पकडीमध्ये कधीही येत नाही.

थोडक्यात इतर व्यवस्थांपासून चिन्हव्यवस्थांना वेगळा काढणारा जो गुणधर्म असतो तो फक्त भाषिक व्यवस्थेमध्येच स्पष्टपणे आढळतो, आणि भाषिक व्यवस्थेचे जे पैलू सर्वांत कमी अभ्यासिले जातात त्या पैलूंमध्ये हा गुणधर्म आढळतो. त्यामुळे चिन्हमीमांसा या विज्ञानाची गरज आणि त्याची खास मौलिकता या गोष्टी स्पष्टपणे लक्षात येत नाहीत. परंतु माझ्या मते भाषिक समस्या ही मुख्यत: चिन्हमीमांसात्मक आहे आणि यावरच इतर सर्व बाबींचे (भाषिक अभ्यासाच्या विकासाच्या सर्व टप्प्यांचे) महत्त्व अवलंबून आहे. भाषेचे खरे स्वरूप शोधून काढायचे असेल तर इतर चिन्हव्यवस्था आणि भाषिक व्यवस्था यांमध्ये कोणते समानगुणधर्म आहेत हे जाणून घेतले पाहिजे. प्रथमदर्शनी जे प्रभावी भाषिक घटक (forces) अत्यंत महत्त्वाचे वाटतात (उदा० वागिंद्रियांचे कार्य), ते जर भाषिक व्यवस्थेला इतर चिन्हव्यवस्थांपासून वेगळे ठेवत असतील तर त्यांना दुय्यम स्थानच मिळेल. या अभ्यासपद्धतीमुळे आपल्याला भाषिक समस्येच्या स्पष्टीकरणाच्याही पलीकडे जाता येईल. विधिव्यवस्था, चालीरीती इत्यादींचा अभ्यास चिन्हे म्हणून केला तर तथ्यांवर एक नवाच प्रकाश पडेल आणि चिन्हमीमांसा या विज्ञानामध्ये त्यांचा अंतर्भाव करून या विज्ञानाच्या नियमांच्या साहाय्याने त्यांचे स्पष्टीकरण देता येईल, अशी माझी धारणा आहे.

**संपादकांच्या टिपा:**

टीप १ व २ प्रस्तावनेच्या (Introduction) पहिल्या प्रकरणात (Chapter I A Glance at the History of Linguistics) येतात. येथे केवळ दुसऱ्या प्रकरणाचे भाषांतर आहे. तरी मूळ पाठ्यातील टीपक्रमांक संदर्भाच्या सोईखातर जशास तसेच ठेवण्यात आलेले आहेत.

३. चिन्हमीमांसा आणि अर्थमीमांसा यांच्यात गल्लत करून चालणार नाही. अर्थमीमांसेमध्ये अर्थपरिवर्तनाचा अभ्यास होतो आणि सोस्यूरने याची चर्चा पद्धतशीरपणे केलेली नसली तरी अर्थमीमांसेची मूलतत्त्वे त्याने मांडून ठेवली आहेत.

४. तुला. A Naville, Classification des Sciences, दुसरी आवृत्ती, पृ० १०४

**विभाग पहिला: सामान्य तत्त्वे**

**प्रकरण १ : भाषिक चिन्हाचे स्वरूप**

**१. चिन्ह, चिन्हित, चिन्हक**

काही लोक असे मानतात की भाषिक व्यवस्थेचा विचार तिच्या मूलघटकांच्या पातळीवर केला की ती केवळ एक नामकरण प्रक्रिया ठरते - म्हणजेच भाषिक व्यवस्था ही एक शब्दजंत्री असते, व तिच्यातील प्रत्येक शब्द विशिष्ट वस्तूचे नामकरण करून त्या वस्तूशी संबंध जोडत असतो. उदा०



: *ARBOR*



: *EQUOS*

etc. etc.

या संकल्पनेवर अनेक आक्षेप घेता येतात. या संकल्पनेत असे गृहीत धरले आहे की कल्पना या शब्दपूर्व (म्हणजे शब्दांवर अवलंबून नसणाऱ्या) अशा पातळीवर अस्तित्वात असतात. नामाभिधान हे उच्चारित असते की मानसिक असते, हे या संकल्पनेत स्पष्ट केलेले नाही. (उदा० arbor [झाड] या शब्दाचा विचार दोन्ही प्रकारे करता येतो); शेवटचा आक्षेप म्हणजे एखादे नामाभिधान व एखादी वस्तू यांच्यातील जोडणी ही एक सरळसोपी प्रक्रिया आहे असे गृहीत धरण्याची मुभा आपल्याला या संकल्पनेमुळे मिळते; आणि हे गृहीतकृत्य पूर्णपणे असत्य आहे. परंतु या काहीशा भाबड्या भूमिकेमुळे आपण सत्याच्या काहीसे जवळही येऊ शकतो, कारण येथे भाषिक एकक ही दुपदरी गोष्ट असते; म्हणजेच दोन अंगांची जुळणी करून भाषिक एकक सिद्ध होतो, हे येथे दाखविता येते.

भाषिक चिन्हाचे दोन्ही मूलघटक हे मनोगत/मानसिक स्वरूपाचे असतात आणि मेंदूमध्ये एका साहचर्यात्मक जोडणीमुळे ते एकत्र येतात, हे आपण वाचिक मंडलाचा विचार करताना पाहिले आहे. हा मुद्दा नीट लक्षात घेतला पाहिजे.

भाषिक चिन्हामध्ये जोडणी होते ती एक वस्तू व एक नामाभिधान यांची नव्हे तर एक संकल्पना व एक ध्वनि-स्वनप्रतिमा यांची होते[१]. ध्वनि/स्वन-प्रतिमा म्हणजे एखादा प्रत्यक्ष भौतिक वस्तूच्या रूपात अस्तित्वात असणारा ध्वनी नसतो तर त्या ध्वनीचा मनोगत ठसा असतो, किंवा त्या ध्वनीने आपल्या संवदेनांवर उमटविलेला हा ठसा असतो. ध्वनिप्रतिमा ही संवेदनागत असते, आणि मी जर तिचा उल्लेख 'भौतिक' असा केला असेल तर तो त्या (म्हणजे 'ठसा' या) अर्थानेच केला आहे; विशेषतः संकल्पना या दुसऱ्या मूलघटकाशी तिचा असणारा विरोध दर्शविण्यासाठी केलेला आहे, कारण सर्वसामान्यपणे संकल्पना ही या ठशापेक्षा अधिक अमूर्त असते.

आपल्या स्वतःच्या समग्र वाचिक व्यवहाराचे निरीक्षण आपण करू लागलो की आपल्या ध्वनि-प्रतिमेचे मनोगत स्वरूप स्पष्ट होऊ लागते. आपले ओठ वा जीभ न हलवताही आपण स्वतःशी बोलू शकतो किंवा एखादा पद्यवेचा मनातल्या मनात म्हणू शकतो. आपल्या भाषेचे शब्द हे ध्वनि-प्रतिमा म्हणून आपण मानत असल्याने शब्द ज्या घटकांचे बनलेले असतात त्या 'स्वनिमां'च्या उच्चारणाचा उल्लेख येथे टाळायला हवा. या संज्ञेने उच्चारणप्रक्रिया सूचित होते व त्यामुळे उच्चारित शब्दाच्या बाबतीतच, ती लागू पडते; म्हणजे संभाषितामध्ये अंतर्गत (वा मनोगत) प्रतिमांचे जे प्रत्यक्षीकरण होत असते त्यालाच 'स्वनिम' ही संज्ञा लागू पडते. शब्दाचे ध्वनी आणि स्वनावयव असा उल्लेख करून आपण गैरसमज टाळू शकतो, मात्र या शब्दांनी ध्वनि-प्रतिमांचा निर्देश होतो हे ध्यानात ठेवायला हवे.

तेव्हा भाषिक चिन्ह ही दोन बाजू असणारी एक मनोगत गोष्ट असते. तिचा निर्देश खालील आकृतीने करता येईल:




यातील दोन घटकांची परस्परांशी घट्ट जुळणी झालेली असते आणि एकाबरोबर दुसराही येतोच. लॅटिनमधील arbor या शब्दाचा अर्थ शोधताना किंवा 'झाड' या संकल्पनेसाठी लॅटिनमध्ये कोणता शब्द वापरतात हे शोधताना त्या भाषेत जी साहचर्ये मान्य झालेली आहेत तीच वास्तवाशी जुळताना आपल्याला दिसतात; कल्पना करता





अनुक्रमणिका

येण्याजोग्या इतर साहचर्यांकडे आपण येथे दुर्लक्ष करतो.

भाषिक चिन्हाची आपण जी व्याख्या केली आहे तिच्यामुळे एक महत्त्वाची संज्ञाविषयक समस्या उभी राहते. एखादी संकल्पना आणि एखादी ध्वनि-प्रतिमा यांच्या जुळणीला मी चिन्ह असे म्हटले; परंतु प्रचलित वापरानुसार 'चिन्ह' ही संज्ञा फक्त ध्वनि-प्रतिमेचा निर्देश करण्यासाठी, उदा० एखाद्या शब्दाचा (arbor इ०) निर्देश करण्यासाठी वापरली जाते. खरे म्हणजे, arbor हे एक चिन्ह ठरते ते त्याच्याबरोबर 'झाड' ही संकल्पना जोडली गेल्यामुळेच हें आपण विसरतो व त्यामुळे संवेदनात्मक भागाच्या कल्पनेतूनच संपूर्ण एककाची कल्पना सुचविली जाते (असे आपल्याला वाटते).




येथे तीन संकल्पना दडलेल्या आहेत, त्यांना तीन वेगळी नावे दिली तर संदिग्धता दूर होईल. यांतील प्रत्येक नाव इतर दोन नावांपासून वेगळे आणि त्यांचे सूचन करणारेही असेल. 'चिन्ह' हा शब्द संपूर्ण एककासाठी वापरावा, तर 'संकल्पना' या शब्दाऐवजी 'चिन्हित' आणि ध्वनिप्रतिमा या शब्दाऐवजी 'चिन्हक' असे शब्द वापरावे, असे मी सुचवितो. 'चिन्हक' व 'चिन्हित' या संज्ञा वापरण्याचा फायदा असा की त्या परस्परविरोधी असल्याने भिन्न आहेत; त्याचप्रमाणे त्या ज्या संपूर्ण एककाचा भाग आहेत त्याच्यापासूनही भिन्न आहेत, असे सुचविले जाते. 'चिन्ह' या संज्ञेबाबत भाषेच्या नेहमीच्या वापरात मला तिच्यासाठी दुसरी संज्ञा आढळली नाही एवढ्यासाठीच मी तिच्याबाबत समाधानी आहे.

आता आपण जी भाषिक चिन्हाची व्याख्या पाहिली तिच्यानुसार भाषिक चिन्हाचे दोन मूलभूत गुणधर्म असतात. या गुणधर्मांची मांडणी करतानाच या प्रकारच्या अभ्यासाच्या मूलभूत तत्त्वांचीही मांडणी मी करणार आहे.

**२. तत्त्व १: चिन्हाचे यादृच्छिक स्वरूप** [भा६]

चिन्हक आणि चिन्हित यांच्यामधील बंध हा यादृच्छिक असतो. चिन्हक आणि चिन्हित यांची जोडणी केल्यानंतर जे उद्भवते ते चिन्ह असा अर्थ मी लावत असल्याने भाषिक चिन्ह हे यादृच्छिक असते असे मी म्हणू शकतो.

'बहीण' या चिन्हितासाठी फ्रेंचमध्ये s-ö-r ही ध्वनिसंहती चिन्हक म्हणून वापरली जाते, परंतु (ही ध्वनिसंहती आणि अर्थ) यांचा परस्परांशी अंतर्गत असा काहीही संबंध नसतो; त्याच चिन्हितासाठी इतर कोणती तरी ध्वनि-संहती चिन्हक म्हणून सहज चालू

शकली असती. वेगवेगळ्या भाषांमध्ये या बाबतीत सारखेपणा नसतो; किंबहुना वेगवेगळ्या भाषांचे अस्तित्व, हा यासंबंधीचा पुरावाच ठरतो. 'बैल' या चिन्हिताला b-ö-f असा चिन्हक (भौगोलिक) सीमारेषेच्या एका बाजूला असतो तर o-k-s (ochs) असा वेगळा चिन्हक दुसऱ्या बाजूला वापरला जातो.

चिन्हाचे स्वरूप यादृच्छिक असते या तत्त्वावर कोणी आक्षेप घेत नाही. एखाद्या सत्याचा शोध लावणे हे बऱ्याचदा सोपे असते, परंतु त्या सत्याला योग्य ते स्थान देणे हे तुलनेने अवघड असते. पहिले तत्त्व (यादृच्छिकतेचे तत्त्व) हे समग्र वाचिक व्यवहाराच्या वैज्ञानिक अभ्यासाच्या सर्व प्रकारांवर हुकमत गाजवते; आणि त्याचे असंख्य परिणाम दिसून येतात. सर्वच परिणाम एका दृष्टिक्षेपात लक्षात येतीलच असे नाही; अनेक क्लृप्त्या केल्यानंतरच त्यांचा शोध लागू शकतो, आणि त्यातूनच या तत्त्वाचे पायाभूत महत्त्व लक्षात येऊ शकते.

येथे जाता जाता एक बाब नोंदवायला हवी : चिन्हमीमांसा या क्षेत्राचे जेव्हा एक विज्ञान म्हणून व्यवस्थितीकरण होईल तेव्हा एक प्रश्न उभा राहील; तो म्हणजे : मूकाभिनय (पँटोमाईम) यासारख्या पूर्णपणे नैसर्गिक चिन्हांवर आधारलेल्या आविष्कारपद्धतींचा अंतर्भाव चिन्हमीमांसेत करणे उचित ठरेल की नाही? समजा या नव्या विज्ञानाने त्यांचा अंतर्भाव केला तरीसुद्धा या विज्ञानाचा मुख्य रोख असेल तो चिन्हाच्या यादृच्छिकतेवर आधारलेल्या व्यवस्थांकडे. वस्तुतः, समाजात आविष्कारासाठी वापरले जाणारे प्रत्येक माध्यम हे तत्त्वतः सामूहिक वर्तनावर - म्हणजेच संकेतांवर आधारलेले असते. नमस्कार-चमत्कार यांसारखे (सामाजिक) उपचार हे बऱ्याचदा एक प्रकारच्या नैसर्गिक आविष्कारांवर आधारलेले असतात (उदा० चिनी माणूस आपल्या सम्राटाला नऊ वेळा दंडवत घालतो) हे खरे; परंतु हे (उपचारात्मक) वर्तनही नियमबद्ध असते; आणि या हावभावांच्या अंगभूत/नैसर्गिक (आविष्कारात्मक) मूल्यामुळे नव्हे, तर या नियमांमुळे त्यांचा सामाजिक वापर होत असतो. इतर चिन्हांच्या तुलनेत पूर्णपणे यादृच्छिक चिन्हे हीच व्यक्त करीत असतात, आणि म्हणून आविष्कारव्यवस्थांपैकी सर्वांत व्यामिश्र आणि सार्वत्रिक व्यवस्था म्हणजे 'भाषा', ही चिन्हांकनप्रक्रियेचे सर्वांत उत्तम उदाहरण ठरते. त्यामुळेच भाषा ही अनेक व्यवस्थांपैकी एक चिन्हव्यवस्था असली तरी भाषाविज्ञान ही चिन्हमीमांसेच्या उपशाखांपैकी सर्वांत महत्त्वाची/मार्गदर्शक व्यवस्था ठरते.

'प्रतीक' (सिंबॉल) हा शब्द भाषिक चिन्हासाठी, किंवा अधिक नेमकेपणे बोलायचे तर आपण ज्याला चिन्हक म्हटले आहे त्याचा निर्देश करण्यासाठी वापरला आहे. तत्त्व क्र० १ हे या संज्ञेच्या वापराच्या विरुद्ध जाते. प्रतीकाचा एक गुणधर्म असा की ते पूर्णपणे यादृच्छिक कधीच नसते; (प्रतीकामध्ये) चिन्हक व चिन्हित यांच्यात एक अत्यंत मूलभूत स्वरूपाचा नैसर्गिक बंध असल्याने प्रतीक हे कधीच रिक्त नसते. न्याय या संकल्पनेचे प्रतीक म्हणजे तराजू; आता या प्रतीकाऐवजी दुसऱ्या एखाद्या प्रतीकाचा, उदा० रथाचा, वापर आपल्याला (न्यायाचे प्रतीक म्हणून) करता येणार नाही.

'यादृच्छिक' या शब्दाविषयीसुद्धा काही विवेचन आवश्यक आहे. चिन्हकाची निवड पूर्णपणे बोलणाऱ्या व्यक्तीवर अवलंबून असते असे या संज्ञेतून सूचित होत नाही. (एखादे चिन्ह जेव्हा एखाद्या भाषिक-समाजगटात प्रस्थापित होते तेव्हा व्यक्तींना त्यात हवे तसे बदल करण्याचा अधिकार नसतो, हे आपण पुढे पाहणारच आहोत.) माझे म्हणणे असे की हे हेतूने बांधलेले नसते, म्हणजेच चिन्हकाचे चिन्हिताशी कोणतेही नैसर्गिक असे नाते नसते, या अर्थाने चिन्ह हे 'यादृच्छिक' असते.

हे पहिले तत्त्व प्रस्थापित करताना दोन आक्षेप घेता येणे शक्य आहे, त्यांचा आपण अखेरीस विचार करू:

१) नादानुवर्तित्व या संकल्पनेचा वापर करून असे सिद्ध करता येईल की चिन्हकाची (विशिष्ट चिन्हितासाठी झालेली) निवड ही नेहमीच यादृच्छिक असते असे नाही. परंतु नादानुवर्ती रचना या कोणत्याही भाषिक व्यवस्थेत अंगभूत घटक असत नाहीत. शिवाय या घटकांची संख्याही सर्वसाधारणपणे मानली जाते त्यापेक्षा खूपच कमी असते...

अस्सल नादानुवर्ती शब्दांचा विचार करायचा झाल्यास (उदा० glug-glug, tick-tock इ०) हे शब्द संख्येने फार मर्यादित तर असतातच, शिवाय त्यांची निवडही काहीशी यादृच्छिक असते कारण ते प्रत्यक्ष ध्वनींच्या जवळपासच पोचणारी आणि बऱ्हंशी सांकेतिक स्वरूपाची अनुकरणे असतात. उदा. इंग्रजी bow-wow आणि फ्रेंच ouaoua. शिवाय असे शब्द एकदा का भाषिक व्यवस्थेमध्ये समाविष्ट झाले की काही प्रमाणात इतर शब्दांची जशी उत्क्रांती होते ह स्वनात्मक, पदिमात्मक इ० - तशीच या शब्दांचीही होते. (उदा० pigeon हा शब्द मुळात व्हल्गर लॅटीन pipio पासून आलेला आहे. आणि pipio हा मुळात नादानुवर्ती तत्त्वानुसार रचलेला होता. (मात्र pigeon हा तसा राहिलेला नाही). भाषिक चिन्ह हे सर्वसामान्यपणे हेतूने बांधलेले नसते आणि मुळात नादानुवर्ती असणाऱ्या शब्दांचे नादानुवर्तीत्व निघून जाणे हा त्याचाच अगदी उघड पुरावा आहे.

२) उद्गारवाचके (उद्गारवाचकांचा विचार नादानुवर्ती शब्दांच्या धरतीवर सोस्यूरने केलेला आहे.) नादानुवर्ती रचना आणि उद्गारवाचके ही दुय्यम महत्त्वाची असतात आणि त्यांच्या मूलभूत प्रतीकात्मकतेला अंशतः तरी आव्हान देता येते.

**संपादकांच्या टिपा :**

१. स्वन-प्रतिमा ही संज्ञा फार मर्यादित वाटण्याचा संभव आहे, कारण शब्दाच्या स्वनात्मक प्रतिरूपणाबरोबरच त्याचे प्रत्यक्ष उच्चारण व त्यातील स्नायुगत हालचालींची प्रतिमा यांचाही समावेश असतो. परंतु सोस्यूरच्या धारणेनुसार भाषिक व्यवस्था ही मूलतः एक बाहेरून (समाजातून) मिळालेले भांडार असते. स्वनप्रतिमा ही वाचिक वर्तनातील त्याच्या प्रत्यक्ष उपयोगापलीकडे असते; मूलतः भाषिक व्यवस्था ही एक (सुप्त, अमूर्त अशी) शक्य व्यवस्था असते. या शक्य व्यवस्थेतील एक तथ्य म्हणून शब्द अस्तित्वात असतो आणि त्याचे नैसर्गिक असे प्रतिरूपण स्वनप्रतिमेमुळे होत असते. स्वनप्रतिमेच्या संदर्भात शब्दाचा जो प्रत्यक्ष उच्चारणसंबंधीचा पैलू हा गृहीत धरलेला असतो किंवा दुय्यम महत्त्वाचा असतो.

भाषांतरकारांच्या टिपा :

भा१. सोस्यूरपूर्व भाषाभ्यास मूलत: भाषांतील शब्दांच्या व्युत्पत्ती, त्यांचा उगम व विकास अशा तौलनिक भाषाशास्त्राच्या अंगाने होत होता. येथे सोस्यूर भाषाविज्ञानाची समग्र विषयवस्तू काय असावी याची मांडणी करीत आहे. तेव्हा अर्थातच तो वाङ्मयविद्या याखेरीजही भाषाभ्यासाची ज्ञानक्षेत्रे असू शकतात याचे प्रतिपादन करीत आहे. भाषाशास्त्र, भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या या संज्ञांच्या थोडक्यात मार्मिक आकलनासाठी पाहा : केळकर (१९८३:१३, १४)

भा२. येथे सोस्यूर भाषाविज्ञान व शरीरविज्ञान यांतील संबंधाविषयी विवेचन करीत आहे. भाषाभ्यासात शरीरविज्ञानाचा वाटा म्हणजे ध्वनींच्या उच्चारणासाठी होणाऱ्या मौखिक स्नायुगत क्रिया. उदा० /च/ हा स्वनिम उच्चारताना जीभ कसकशी तालूला स्पर्श करते इ० अथवा /म/ च्या उच्चारणात दोन्ही ओठ, नासिका यांचा कसा सहभाग असतो इ० भाषाभ्यासासाठी या क्रियांची तपशीलवार माहिती उपकारक ठरते. परंतु भाषाविज्ञानाचा मात्र शरीरविज्ञानाला काही उपयोग नाही. भाषेच्या गाभ्यात ध्वनींचे भौतिक स्वरूप कसे औचित्यहीन असते हेच सोस्यूर पुढे सांगणार आहे.

भा३. रूप/आकार विरुद्ध द्रव्य, चिन्हक विरुद्ध चिन्हित, सामाजिक विरुद्ध व्यक्तिनिष्ठ आणि व्यवस्था विरुद्ध उत्क्रांती अथवा एककालिक विरुद्ध कालक्रमिक असे चार प्रकारचे द्वैतभाव वरील चार मुद्यांमध्ये सोस्यूरने उल्लेखिले आहेतच.

भा४. लँग्विज् म्हणजेच समग्र वाचिक व्यवहार ही संज्ञा सोस्यूर दोन अर्थांनी वापरतो. एक, समग्र वाचिक व्यवहार व दोन, भाषाशक्ती. लाङ्गाज या मूळ फ्रेंच संज्ञेचे इंग्रजी भाषांतर हॅरिस याने लँग्विज असे केले आहे तर बास्किन याने ह्यूमन स्पीच असे केले आहे.

भा५. व्हिटनी (विल्यम ड्वाईट व्हिटनी १८२७ ते १८९४) हा अमेरिकी भाषावैज्ञानिक, भाषाशास्त्रज्ञ आणि कोशकार होता. त्याने लिहिलेले 'संस्कृत ग्रामर' (१८७९) प्रसिद्ध आहे. १८८९-९१ दरम्यान प्रकाशित झालेल्या मानाच्या सेंचरी डिक्शनरीचा तो प्रमुख संपादक होता. वेद, वेदांचा पद्यात्मक अनुवाद, व्याकरण, भाषाशास्त्र यावर त्याने विपुल लेखन केले. त्याचबरोबर भाषा, भाषिक तत्त्वे, भाषिक पदार्थ व स्वरूप, भाषा व डार्विनवाद अशा विविध व त्या काळी अपवादानेच हाताळल्या जाणाऱ्या विषयांवर त्याने मार्मिक लेखन केले होते. १८५३पासून व्हिटनी येल विद्यापीठात अध्यापनरत होता. व्हिटनीवरील अधिक माहितीसाठी पाहा :

http://www.bartelby.net/228/0226.html,

http://www.ling.yale.edu/history/whitney.html,

http://en.wikipedia.org/wiki/William_Dwight_Whitney

भा६. यादृच्छिकतेबरोबरच सोस्यूरने तत्त्व चिन्हकाची रेषात्मकता असे दुसरे तत्त्वही पुढे मांडले आहे मात्र चिन्हमीमांसेच्या पुढील विकासामध्ये हे तत्त्व फारसे महत्त्वाचे राहिले नाही व त्यामुळे येथे त्याचे भाषांतर दिलेले नाही.





अनुक्रमणिका

**संदर्भ**

किंबहुने, रवींद्र. १९९०. 'सोस्यूर यांचा भाषावैज्ञानिक विचार', भाषा आणि जीवन, वर्ष ८, अंक ३, पृ० २४-३१

केळकर, अशोक रामचंद्र. १९८३. वैखरी. मुंबई : मॅजेस्टिक.

मालशे, मिलिंद स० २००९. आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन. मुंबई : लोकवाङ्मय (चौथी आवृत्ती).

मालशे, मिलिंद आणि अशोक जोशी. २००७. आधुनिक समीक्षा-सिद्धान्त मुंबई : मराठी विभाग : मुंबई विद्यापीठ आणि मौज.

सोस्यूर, फेर्दिनां द. १९५९. कोर्स इन जनरल लिंग्विस्टिक्स (भाषांतरकार वेड बास्किन) फॉण्टाना/कॉलिन्झ

सोस्यूर, फेर्दिनां द. १९८३. कोर्स इन जनरल लिंग्विस्टिक्स (भाषांतरकार रॉय हॅरिस) इलिनॉय : ओपन कोर्ट

सोस्यूर, फेर्दिनां द. २००६. (संपा०) सायमन बुके आणि इतर. रायटिंग्झ इन जनरल लिंग्विस्टिक्स. लंडन : ओयूपी

■

मानव्य विद्या व सामाजिक विज्ञाने विभाग, भारतीय तंत्रज्ञान संस्थान,
पवई, मुंबई 400 073
मिलिंद मालशे : स्थिरभाष : (022) 2576 7351/2, 2570 7671
चलभाष : 098203 45492, ई-पत्ता : milindmalshe@yahoo.com
चिन्मय धारुरकर: चलभाष : 093716 77728
ई-पत्ता : chinmayvijay@gmail.com

नासिकच्या वर थोडासा प्रवास केला की, लगेच शिष्ट लोकांच्या भाषेत देखील पाच-दहा शब्दांगणीक 'भाऊ', 'बारे' हे शब्द आल्याखेरीज राहात नाहीत. साताऱ्याकडील मराठ्यांसंबंधी ज्याप्रमाणे सामान्य रीतीने 'कायरे पावण्या' असा शब्दप्रयोग करतात, त्याप्रमाणे खानदेशातील माणसासंबंधी 'खानदेशी भाऊ' असा शब्दप्रयोग हमखास करतात. त्याचप्रमाणे दुसरी ढोबळ खूण म्हटली म्हणजे 'ळ'काराबद्दल 'य'कार येतो ही होय. उदा० डोया<डोळा, कावीय<कावीळ. तशीच प्रयोगांमधीलही एक विशिष्ट खूण आहे. चालू वर्तमानकाळ खानदेशी भाषेत एका सहायक क्रियापदाच्या मार्फत साधतात. 'करून राहिलो आहे', 'येऊन राह्यलो', 'वाचून राह्यलो' इत्यादी प्रयोग चालू वर्तमानकाळाचे वापरतात. तसेच बोलण्यामध्ये आंडोर, डिक्री, कुदी खाणे, अत्राप, बश, अखोर, कठे तठे, खेसर, जोयचे वगैरे प्रांतिक शब्दविशेषही येतात. खानदेशी किंवा अहिराणी भाषेच्या अशा ह्या खुणा आहेत.

- कृ०पां० कुलकर्णी. *मराठी भाषा - उद्गम व विकास*

# व्याकरण महाभाष्याची प्रस्तावना - एक मराठीकरण

धनंजय वैद्य

**।। ओनामा शब्द-अनुशासनाचा हा ।।**

भरपूर अभिव्यक्तिस्वातंत्र्य देणारी स्वभाषा किती आणि कशी नियमित आहे हे रोज व्यवहारात आपल्याला जाणवतसुद्धा नाही. परंतु स्वबोली अस्खलित बोलणारी अशिक्षित व्यक्ती भेटते, किंवा भाषा चाचपडत बोलणारा परभाषक विद्वान भेटतो, तेव्हा अगदी मूलभूत प्रश्न मनात येतात - ''भाषेतले शब्द म्हणजे आहे तरी काय?'' ''त्यांची व्यवस्था का लावायची?'' ''नियम कुठले, अपवाद कुठले?'' ''आपण वेगवेगळ्या बोली बोलतो, त्यात प्रमाण काय असते?'' ''प्रत्येकाच्या नाकातोंडातून आवाज वेगळा फुटतो, तर मग भाषेत शब्द काय, ध्वनी तरी ठरावीक कसे असू शकतात?''

फार पूर्वी इ०स० पूर्व २००-३०० काळात या प्रश्नांवर पतंजलीने बारकाईने विचार केला होता. संस्कृत स्वभाषा आणि याज्ञिक आर्यांची वैदिक संस्कृती ही त्याच्या समाजातील गृहीतकृत्ये होत. पण त्याचे तटस्थ वैज्ञानिक विश्लेषण या स्थलकालाच्या भिंती फोडून कुठल्याही भाषेला लागू होते. त्याच्या महाभाष्य ग्रंथातले पहिले 'पस्पशा' प्रकरण खेळकर पण बिंदुगामी संवादाच्या रूपात आहे. त्याची प्रश्नोत्तरे मराठी भाषेत, आपल्या स्थळकाळातली उदाहरणे घेऊन आपण येथे वाचू या - दोन- अडीच हजार वर्षानंतरही त्याच्या हजरजबाबी शैलीतल्या शंका भेदक, आणि समाधाने समर्पक वाटतील.

**भाषेसंदर्भात शब्द म्हणजे काय?**

आक्षेप : कोणते हे शब्द?

उत्तर : बोली आणि लेखी शब्द. (मुळात लोकवापरातले आणि वेदातले शब्द) बोली- बैल, घोडं, मोटार. लेखी-ओम् नमो जी आद्या, हृदयाची स्फूर्ती, आम्ही भारताचे नागरिक वगैरे.

आक्षेप : 'बैल' याच्यात शब्द कुठला? हे जे शिंग, वशिंड, शेपूट वगैरे असलेले, तेच का?

आक्षेप-विरोध : नाही, ती पदार्थवस्तू आहे.

आक्षेप : मग हे जे हलते, डुलते, फुरफुरते आहे, तो शब्द आहे काय?

आक्षेप विरोध : नाही, तिला क्रिया म्हणतात.

आक्षेप : मग हे जे पांढरे, काळे, करडे, तांबूस आहे, ते शब्द आहे काय?

आक्षेप-विरोध : नाही, त्याला गुण म्हणतात.

आक्षेप : मग जे तोडून तुटत नाही फोडून फुटत नाही, आणि वेगवेगळ्या ठिकाणी

एकसारखे दिसते, तो शब्द काय?

आक्षेप-विरोध : नाही, त्याला आकृती म्हणतात.

आक्षेप सारांश : तर मग शब्द म्हणजे आहे तरी काय?

उत्तर : ज्याचा उच्चार केला की शिंग, वशिंड, शेपूट वगैरे असलेल्या जनावराचा बोध होतो, तो शब्द. किंवा, ज्याने पदार्थाचा बोध होतो त्या ध्वनीला शब्द असे म्हणतात. लोक म्हणतातच ना- काहीतरी शब्द बोल, त्याला शब्द फुटेना, आमचा बाळ शब्द बोलतो, वगैरे. हे सगळे ध्वनी केल्याबद्दलच. तसला ध्वनी म्हणजे शब्द.

**शब्दांची व्यवस्था लावण्यासाठी प्रयोजने**

आक्षेप : या शब्दांची व्यवस्था का बरे लावावी?

उत्तर : पहिले प्रयोजन आहे 'रक्षण'. आपल्या भाषेत कितीतरी उत्कृष्ट कलाकृती गुरुशिष्यांच्या मौखिक परंपरेतूनच सांगितलेल्या आहेत. त्यांचे रक्षण झाले पाहिजे.

आक्षेप : पण ध्वनिमुद्रण आणि लेखन पुरणार नाही काय?

उत्तर : नाही, मूळ उच्चारात आणि अर्थामध्ये, विशिष्ट बोलीच्या संदर्भाने, काही खुबी असतात. त्या गुरूकडून शिष्याकडे थेट गेल्या पाहिजेत. प्रदीर्घ परंपरेत कलाकृतीचा ऱ्हास होऊ नये, शब्दाच्या उच्चारात, हेल काढण्यात काय अर्थ आहे, ते कळत राहावे, म्हणून शब्दांचे शास्त्र शिकावे.

दुसरे प्रयोजन आहे 'वाक्यबदल' : करारपत्रे, निविदा सूचना, वगैरे तयार करण्याची एक अगदी काटेकोर भाषा असते. पुढे विवाद होऊ नये, म्हणून वकिली पुस्तकात सांगितलेल्या नमुन्यात जशी आहे, तशीच भाषा ठेवावी लागते. पण त्या-त्या अशिलाला योग्य किंवा स्वत:ला लागू असे वाक्यबदल करावे लागतात. त्या 'नमुनेदार' वाक्यांत फक्त स्त्री/पुरुष, एक व्यक्ती की अनेक, असे बदल नीट करायला शब्दांचे व्याकरण शिकावे लागते.

तिसरे प्रयोजन आहे 'लघु-उपाय' : सुशिक्षित माणसाला शब्दांचे ज्ञान जरूर असावे. शब्दांची वर्गवारी लावल्यामुळे शब्दज्ञानाचा पसारा आटोपशीर होतो, म्हणून शब्दांचे व्याकरण शिकावे.

चौथे प्रयोजन आहे. 'व्यवहारात असंदिग्धपणा' : ''पुरणपोळीचा बेत आहे, पाठवून द्या'', असे गिऱ्हाईक म्हणतो. म्हणजे पुरण आणि पोळीचा, की पुरणाच्या पोळीचा? त्या दोन अर्थांत उच्चाराचा (स्वराच्या आघातांचा) फरक असतो, हे माहीत असले तर आचाऱ्याला शंका राहत नाही, आणि योग्य पदार्थ तो गिऱ्हाइकाकडे पुरवतो.

आक्षेप : या चारही बाबतीत आपण कसे बोलावे, त्या बाबतीत परतंत्र असतो. जिथे स्वतंत्र असतो तिथेसुद्धा व्यवस्था लावायची गरज आहे का?

उत्तर : स्वतंत्र प्रयोजने हवीत काय- ही घ्या!

परप्रांतीयांचे मराठी - हुबळीहून आलेली सून, विरहात म्हणते ''आमचे नवरे

गेले''. परप्रांतीयांना मराठीत आदरार्थक बोलण्याचे नियम, 'गेले' एका विशिष्ट प्रकारे म्हटले की 'वारले' असा अर्थ होतो, असे बारकावे कळत नाहीत. मराठी माणसाशी कामापुरते बोलायची मारामार, मनातले बोलून सांगणे कठीण जाते. मराठीभाषकांचे आपापसात असे होऊ नये. म्हणून भाषेतले बारकावे शिकावे.

निर्जीव शब्द - लेखी शब्द वाचताना कुठे जोर द्यायचा, कुठे हेल द्यायचा ते माहीत नसले, तर वाचलेले शब्द सरदलेल्या काडीसारखे मुळी पेटच घेत नाहीत. लेखीचा प्रकट बोलीशी संबंध कळावा म्हणून व्याकरण शिकावे.

इश्श - बायकांच्यात इश्श, गडे, वगैरे म्हणतात. लहान बाळे एकएक अक्षर दोनदा बोलतात - ''दुदू, शिशी'' भाषेच्या या लकबी कुठे कोणाशी ठीक ते जाणले पाहिजे, म्हणून शब्दांचे शास्त्र शिकावे.

अकार चरण युगुल - अकार चरण युगुल । उकार उदर विशाल । मकार महामंडल । मस्तकाकारें।[१]

शब्दांत आणि ध्वनींमध्ये एक प्रकारचे गूढ आध्यात्मिक आकर्षण आपल्याला जाणवते. आपल्याला ध्वनींचे विश्लेषण करावेसे वाटते. म्हणून शब्दाच्या ध्वनींबद्दल शिकावे.

उत त्व: ऋचा :

कुणी हीस पाहोनि मुळी न पाही ।
दुजा वाणि ऐकोनि ऐकीत नाही ।
स्वामीस प्रकटून गूढार्थ राही ।
वस्त्रांस ढाळून कामा:तुरा ही ।।[२]

जो तिच्याकडे नीट लक्ष देत नाही त्याला भाषा दिसून दिसत नाही, ऐकून ऐकू येत नाही. तिच्या स्वामीपुढे मात्र ती झाकणारी वस्त्रे सोडून आपले सौंदर्य दाखवण्यास आतुर असते. आपल्यापुढे तिचे सौंदर्य प्रकट व्हावे म्हणून तिच्यावर प्रभुत्व मिळवावे.

चावुण्डराजें - **चावुण्डराजें करवियलें**. गोमटेश्वराच्या पायापाशी हजारावर वर्षांपूर्वीचा हा शिलालेख आहे. आपल्या मराठी पूर्वजांची स्मृतिचिन्हे आपल्याला समजावीत, आणि आपली स्मृतिचिन्हे पुढच्या पिढ्यांना समजावीत, म्हणून शब्दांचे शास्त्र शिकावे आणि शिकवावे.

आक्षेप : ज्याला व्याकरण नाहीतरी शिकायचे आहे त्याच्यासाठी ही सगळी प्रयोजने ठीक आहेत. पण अक्षराला अक्षर लावून जमेल तितकी पुस्तके वाचणारे असतात, त्यांच्यासाठी प्रयोजने का नाही सांगत?

उत्तर : खरे आहे तुमचे म्हणणे. कित्येक लोक म्हणतात, ''बोली भाषा आम्ही लोकांत बोलून अस्खलित शिकलो, लेखी भाषा पुस्तके वाचून आम्हांला अस्खलित कळते, व्याकरणाचे काय काम?'' त्यांच्यासाठी आम्ही मित्रत्वाने इतकेच सांगतो - या शास्त्राचा अभ्यास करायची आमची आपली ही प्रयोजने आहेत.

---

**भाषेचे नियम कसे सांगावे?**

आक्षेप : शब्दांचे अनुशासन कसे करायचे? सुयोग्य शब्दांचे, अयोग्य शब्दांचे, की दोन्हींचे?

उत्तर : कुठल्याही एकाच प्रकारच्या शब्दांविषयी सांगितले तर पुरते. दोन्हींबद्दल सांगायची गरज नाही. जसे 'काविळीची साथ चालू असताना उकळलेले पाणी प्यावे,' असा नियम आहे. न-उकळलेले पाणी पिऊ नये असे वेगळे सांगावे लागत नाही. 'मांस खाणारी जनावरे खाऊ नये' असा नियम सांगितला म्हणा. तर मांस खाणारी कुत्री, मांजरे वगैरे जनावरे खाता येत नाहीत ते कळतेच. पण बोकड, ससे, गुरे वगैरे, शाकाहारी जनावरे खाता येतात, तेही कळते. तसेच 'बैल' हा शब्द समजावला तर (मराठी प्रांताबाहेर करतात ते उच्चार) 'बॅल, बएल, बेल, बोईल' हे सगळे चालणार नाही असे कळते. आणि सर्व न चालणारे उच्चार सांगितले, तर 'बैल' असा उच्चार चालतो, हे आपोआप समजते.

आक्षेप : तर मग सुयोग्य/अयोग्य यांपैकी कुठले सांगणे उजवे?

उत्तर : सुटसुटीतपणासाठी सुयोग्य शब्द सांगणे बरे. कारण प्रत्येक शब्दाची कितीतरी अप-रूपे आहेत.

आक्षेप : सुयोग्य शब्दांची एक-एक करून यादी आत्मसात करावी लागेल काय? म्हणजे बैल, घोडं, मोटार..?

उत्तर : नाही. एक-एक शब्दाचा उच्चार करून तो आत्मसात करणे जमायचे नाही. अशी कथा आपण ऐकलेली आहे -

*''बृहस्पतीने इंद्राला एक-एक शब्द एक हजार दिव्य वर्षांपर्यंत समजावून सांगितला, आणि तरी शब्दभांडार संपले नाही.''* बृहस्पतीसारखा गुरू, इंद्रासारखा शिष्य, आणि अभ्यासासाठी सहस्र दिव्य वर्षांचा अवधी असून जमले नाही. मग आजमितीच्या आपणां लोकांचे काय घ्या! मोजूच या. जगून जगून खूप जगलो, तर जगू शंभर वर्षे. विद्येचे चार टप्पे असतात- १. गुरूकडून ती शिकावी, २. आपणहून तिचे मनन करावे, ३. आपल्याला जे समजले ते दुसऱ्यांना शिकवावे, आणि ४. विद्या व्यवहारात आणावी. इथे अख्खे आयुष्य ती फक्त गुरूकडून शिकण्यात खपेल! म्हणून एक-एक शब्द आत्मसात करून जमणार नाही.

आक्षेप : मग हा शब्द नावाचा प्रकार शिकावा तरी कसा?

उत्तर : अनेक शब्दांचे जर एकासारखे काही लक्षण असेल, तर ते सांगावे. मग ज्या-ज्या शब्दांचे त्यावेगळे लक्षण आहे तेवढेच वेगळे सांगावे. अशा प्रकारे थोडाच प्रयत्न करून शब्दांच्या मोठ्या राशीची वासलात लागेल.

आक्षेप : आता कुठल्यातरी लक्षणाबाबत नियम तो कुठला आणि अपवाद तो कुठला समजायचा?

उत्तर : त्यातल्या त्यात जो प्रकार जास्त प्रमाणात दिसतो, त्याला नियम म्हणायचे. जो प्रकार कमी प्रमाणात दिसतो, त्याला अपवाद म्हणायचे. उदा० :





अनुक्रमणिका

पड-तो, पड-ला
वाढ-तो, वाढ-ला
कळ-तो, कळ-ला
बोल-तो, बोल-ला

अशा शब्दांच्या जोड्यांत सुरुवातीचा ध्वनी न बदलण्याचे प्रमाण मोठे आहे. अशा परिस्थितीत सुरुवातीचा ध्वनी बदलत नाही असा नियम मानावा.

जा-तो, गे-ला
ये-तो, आ-ला

जोड्या पूर्वीसारख्याच, पण सुरुवातीचा ध्वनी बदलला. हे अपवाद म्हणून सांगायचे.

आक्षेप : आता नियम आणि अपवाद करताना, आपण शब्दांच्या वर्गांबद्दल बोलत असतो, की एका-एका विशिष्ट शब्दाबद्दल?

उत्तर : सोयीनुसार असेल. शब्दांच्या वर्गांबद्दल नियम, अपवाद सांगावेत, नाहीतर एका-एका विशिष्ट शब्दाबद्दल.

**शब्द नित्य असतात का? - त्यांचे शाश्वत असे प्रमाणरूप असते का?**

आक्षेप : आता सांगा, शब्दाला व्याकरणशास्त्रावेगळे नित्य अस्तित्व असते काय?

उत्तर : दोन्ही प्रकारे वेगवेगळ्यांनी शास्त्र शिकवले आहे : (१) शब्द हे व्याकरणशास्त्राच्या आधीपासून नित्य आहेत, आणि (२) शब्द हे व्याकरणशास्त्र सांगते म्हणून बनतात. पण आपले शास्त्र कशा प्रकारे लिहिले आहे? त्यातल्या त्यात आपले गृहीतक आहे : शब्द-अर्थ-संबंध नित्य आहे.

आक्षेप : या गृहीतकाचा याठिकाणी काय संदर्भ लावायचा?

उत्तर : संदर्भ हा, की शब्द आणि अर्थ यांच्यामधला संबंध नित्य, म्हणजे व्याकरणाच्या आधीपासूनचा असला, तर नियम आणि अपवाद हे शब्दाच्या स्थायी आकृतीबद्दल केलेले आहेत, प्रत्येक उच्चाराबद्दल नव्हेत.

आक्षेप : आकृती स्थायी आहे असे कसे म्हणता? सोन्याची साखळी मोडून कानातले डूल बनवले, ते मोडून वळे बनवले, ते मोडून आंगठी. आकार तर सारखे बदलतात, मूळ सोने ते बदलत नसते. तसा शब्दोच्चारात बाहेर पडणारा आवाज तेवढा नित्य असतो.

उत्तर : नाही. आकृती नित्य असते. एक सोन्याचे वळे मोडले, तरी वळे ही आकृती दुसऱ्या एका सोन्याच्या तुकड्यात दिसते. आकृती म्हणजे त्या वस्तूचे तत्त्व, तिचा 'वस्तूपणा'.[३]

आक्षेप : शब्द-अर्थाचा संबंध नित्य आहे हे गृहीत धरायचे ते कशावरून समजते?

उत्तर : आपला सिद्धांत आहे की, हे लोकांकडून समजते. लोकांमध्ये अर्थ एकमेकांना सांगायचा म्हणून शब्द वापरतात. शब्द उत्पन्न करायला त्यांना मोठा प्रयत्न करावा

लागत नाही. मडके वापरण्यापूर्वी, माणसाला कुंभाराकडे जाऊन ''मडके करून दे'' म्हणून ते करवून घ्यावे लागते. शब्द वापरण्यापूर्वी कोणी व्याकरणाकडे जाऊन ''शब्द बनवून दे'' म्हणून जात नाही.

आक्षेप : अहो, जर लोकात अर्थ सांगण्यासाठी वापरतात तेच प्रमाण आहे तर मग शास्त्राची काय गरज?

उत्तर : आपला सिद्धांत आहे की, लोकांत अर्थासाठी शब्द वापरले जात असले तरी 'बरे काय दिसते' तो प्रकार सांगण्यासाठी शास्त्र सांगतात. महाराष्ट्रभर वावरात सगळ्या ठिकाणी सभ्य लोकांत प्रशस्त वाटेल असे बोलायचे, तर कसे बोलायचे? अर्थपूर्ण शब्दांचेही प्रशस्त-अप्रशस्त असे वर्गीकरण करावे लागते, म्हणून शास्त्र सांगतात. यासाठी पुरावा काय, तर लोकांच्या रोजच्या वागण्यात आणि सणासुदीच्या रीतिरिवाजात असे दिसतेच. दृष्टांत घ्या :

भूक शमवायची असेल तेव्हा वाटेल ते मांस खाऊन भूक शमवता येते. तरी महाराष्ट्रभर म्हणावे तर कुठले मांस खाल्ले तर बरे दिसते, आणि कुठले मांस खाल्लेले बरे दिसत नाही, त्याचा नियम सांगतात. जंगलाजवळ राहणारे लोक मोराचे मांस खातात तरी शहरी संस्कृतीत ते खाल्लेले लोकांना आवडत नाही. आणखी उदाहरण द्यायचे तर बघा, एखादा पुरुष (किंवा स्त्री) कामवासना कुठल्याही स्त्रीबरोबर (किंवा पुरुषाबरोबर) भागवू शकतो. पण तिथेही सभ्य लोकांत काय चालते त्याचे नियम असतात.

हे दृष्टांत अतिरेकी नव्हेत. भाषा सभ्य वाटली नाही तर लोक गुणी व्यक्तीचेही अवमूल्यन करतात. 'ती फुलराणी' नाटक बघताना हे प्रेक्षकांना वाटते. एखाद्या स्थानिक शैलीतले नाटक महाराष्ट्रभर खूप अपवादाने चालते. तिकिट विकत न घेता दूरदूरचे मराठी प्रेक्षक अशा नाटककंपनीच्या पोटातच नाही का लाथ घालत? सोपानदेव चौधरींनी म्हणे भीतभीत आपल्या आईच्या कविता लोकांना दाखवल्या. लोकविलक्षण प्रतिभेच्या होत्या म्हणून बहिणाबाईंना महाराष्ट्राने डोक्यावर घेतले. कविता 'लोकविलक्षण' नसत्या, फक्त चांगल्या असत्या तर आडगावची बोली न समजून महाराष्ट्राने त्यांचा 'दुर्लक्ष' नामक भयंकर अपमान केला असता. सोपानदेवांच्या सुरुवातीच्या भीतीत हेच ज्ञान होते, असे वाटते. हा सगळा विचार करता, दिलेले दृष्टांत इतके काही अतिरेकी वाटत नाहीत.

सणासुदीच्या नियमांबाबत बघू या ना - होळीला पुरण, संक्रांतीला तिळगूळ, आवसेला दिवे, असे गोडाचे करायची प्रथा आहे. त्याऐवजी शेवयांची खीर केली म्हणून काय तोंड गोड व्हायचे राहणार आहे? तरी आपण प्रथा पाळतो, त्यात आपल्याला महत्त्व वाटते. दाराला आंब्याच्या पानांचे तोरण आपण लावतो. फणसाच्या पानांचे लावले तर काय वाईट दिसणार आहे? तरी त्या संदर्भात आपण आंब्याची पानेच निवडतो. वाढदिवस साजरा करताना केक कापताना एका विशिष्ट गाणे म्हणतात. नाही म्हटले, किंवा दुसरे कुठलेतरी गाणे म्हटले तरी काप पडणारच. पण ते गाणे

म्हटल्यामुळे त्या समारंभाची अपेक्षित रंगत आणि आनंद मिळतो.

याच प्रकारे लोकांत वापरले जाऊ शकणारे सगळे शब्द अर्थपूर्ण असले तरी 'बरे काय दिसते' असा नियम शास्त्र करते. त्यानेच माणसाची भरभराट होते.

आक्षेप : अहो, तुमच्या नियमांतून असेही काही शब्द निघतात की जे कधी वापरात ऐकलेले नाहीत, आणि कधी लेखी वाचलेले नाहीत. उदाहरणार्थ ओगरण्याचसाठीच्या, भोगस, अनुमानले वगैरे.

प्रतिप्रश्न : असे असले म्हणून काय मोठा तोटा झाला?

आक्षेप चालू : तुम्हीच तर म्हणालात की लोकांच्या वापरातून हे कळते की आपल्या भाषेत अमुक शब्द चालतो की नाही. कारण तुम्हीच शब्द व्याकरणाआधी नित्य असतात असे म्हणालात. आता तुमच्या शास्त्रातून हे 'चालतील' असे कळते, पण हे तर कधी लोकांत ऐकले किंवा लेखी दिसले नाहीत, 'चालतील' म्हणून ठरवायचे कसे?

उत्तर : अजून तसा प्रयोग नाही तरी तशा अर्थासाठी तसा प्रयोग होईल. आम्ही ''शब्द-अर्थ संबंध नित्य असतो,'' असे म्हटले आहे, पण लोकांमध्ये तसा अर्थ बोलून दाखवायचा प्रसंग आला पाहिजे ना? तुम्ही अजून वापरात ऐकले नाहीत, तरी कुठल्यातरी विशेष प्रसंगी वापरतीलही. अजून कधी दिसली नाही, तरी दीर्घकाळात पुढे कधीतरी दिसू शकेल अशा ग्रहताऱ्यांच्या स्थितीचा विचार खगोलशास्त्र, भौतिकशास्त्र, करतातच ना? दीर्घकाळात तसा शब्दप्रयोग अर्थासाठी चपखल असण्याचा प्रसंग निघेल, म्हणून शास्त्रात त्या शब्दांची सोय करावीच लागते. खुद्द महाराष्ट्रात कोकण, मराठवाडा, विदर्भ, खानदेश वगैरे सगळे प्रदेश आणि उपप्रदेश आहेत. आपले स्वर्गस्थ पूर्वज, पृथ्वीवरचे आपण, आणि भावी पिढ्या आहेत. ज्ञानेश्वरी आहे, संतांच्या गाथा आहेत. प्रत्येक गावची वर्तमानपत्रे आहेत, कविता आहेत. कथा आहेत, कादंबऱ्या आहेत, दिवाळी अंक आहेत, संकेतस्थळे आहेत. तांत्रिक पुस्तके आहेत, शेतसाऱ्याच्या पावत्या आहेत, मसाल्याच्या डब्यावरच्या पाककृती आहेत. हे सगळे असताना, हा असा एक शब्द मराठीत कधी वापरलाच गेला नाही - इतकेच काय वापरलाही जाणार नाही - असे म्हणणे म्हणजे मोठे साहस आहे.

आक्षेप : आता हे सांगा, की 'बरे काय दिसते' ते शब्द जाणण्यात आहे, की तशा शब्दांचा प्रयोग करण्यात आहे?

प्रत्याक्षेप : या दोनमध्ये काय फरक आहे?

आक्षेप : ज्ञान असले की 'बरे काय दिसते' सह 'बरे दिसत नाही ते काय' हे सुद्धा शिकले जाते. जर एक 'चांगले ज्ञान' तर दुसरे 'वाईट ज्ञान' हे ओघानेच नाही का आले? एवढेच काय 'बरे दिसते' त्या बोलण्यापेक्षा 'बरे नाही दिसत' असे शब्द खूप जास्त आहेत. म्हणजे 'चांगल्या' ज्ञानापेक्षा 'वाईट' ज्ञान खूपच जास्त प्रमाणात झाले. म्हणून : 'बरे काय दिसते'चा संदर्भ ज्ञानाशी नसून आचाराशी





अनुक्रमणिका

आहे. कार्यालयीन वगैरे कामात 'बरे काय दिसते / दिसत नाही' ते वापरल्याने फायदा-तोटा होतो. ज्ञानाने नव्हे. तर वापराबद्दल बोला.

प्रत्याक्षेप : मग ज्यांना विनासायास 'बरे दिसते तसे' बोलता येते, त्या सगळ्यांचा फुकटात फायदा होतो.

आक्षेपकर्ता : यामुळे तुम्हांला त्यांचा मत्सर वाटतो की काय?

प्रत्याक्षेप : मत्सर वगैरे मुळीच नाही. पण मग काही लोकांची आपोआप प्रगती होत असेल तर शिकण्यात काय राम?

आक्षेपकर्ता : नाहीतर, ज्याला शिकून नवीन समजेल त्याचा शिकल्यामुळे फायदा होईल.

प्रत्याक्षेप : (हसत) आम्ही असेही बघितले आहे, काही लोक न शिकताच छान बोलतात आणि काही शिकूनही चुका करतात!

समेट : मग आपण विचार करून बघू, की फक्त ज्ञानच नाही, फक्त वापरच नाही, तर ज्ञानपूर्वक 'बरे दिसते' त्या शब्दांचा वापर केला तर प्रगती होते. वर्तमानपत्रात ज्याचा लेख छापून आला, त्याला लेख लिहिण्याचे ज्ञानही आलेच. आणि आधी लेख लिहिण्याच्या पद्धतीचा अभ्यास करेल, त्याचाच लेख वर्तमानपत्रामध्ये छापून येईल.

पुन्हा आक्षेप : पण आपण आधीच नाही का बघितले की 'हवे त्याचे ज्ञान' बरोबर 'नको त्याचे ज्ञान' फार कळते, म्हणजे बेरीज वाइटाकडेच.

आक्षेपाचे निराकरण १ : हा दोष नाही. एका ज्ञानाने उत्कर्ष होतो, म्हणजे दुसऱ्या ज्ञानाने अधोगती होते असे थोडेच असते? सभ्य समाजात प्रणाम करणे वगैरेंनी प्रतिष्ठा वाढते, पण हसणे, खोकणे, शिंकणे, उचकी येणे याबद्दल काहीच नियम नाही. त्याने उत्कर्ष नाही झाला तरी अपकर्षही होत नाही.

आक्षेपाचे निराकरण २ : किंवा जे 'चालणार नाही' त्याच्या ज्ञानाने जे 'चालते' त्याचे ज्ञान अधिक बळकट होते. म्हणजे शेवटी ते चांगल्याकरताच.

आक्षेपाचे निराकरण ३ : नाहीतर म्हणाच तुम्ही की 'चालत नाही' त्याचे ज्ञान वाईट. पण तसेच म्हणणार असाल तर विहीर खणणाऱ्याचे उदाहरण घ्या. खणताना तो धुळीमातीने माखतो, पण विहिरीला पाणी लागताच तो स्वच्छ होतो. विहीरच नसण्यापेक्षा आधी धुळीने माखून, मग स्वच्छ होऊन त्याचा अधिक फायदा होतो. तसेच आधी 'न चालणाऱ्या' शब्दांचे आणि 'चालणाऱ्या' शब्दांविषयीचे ज्ञान मिळवण्याबद्दल समजा.

सारांश उत्तर : काय वाटेल ते माना, पण ज्ञानाचा कधी तोटा होत नाही हा मथितार्थ.

आता ही उदाहरणे घ्या : बाकीबाब बोरकरांनी गोवेकरांना रिझवण्यासाठी कोकणीत सुंदर कविता, गाणी रचली. महाराष्ट्रासाठी मराठीत तशीच उत्तम कविता, गाणी रचली. महाराष्ट्रात त्यांचा सन्मान सर्वांना समजेल अशा मराठी रचनांमुळे झाला. आणि ऐहिक प्रगतीबद्दल घ्या, तर बॅरिस्टर अंतुले कोकणात स्वत:च्या घरची बोली बोलत असतील,

पण विधानसभेत सर्वांना समजणारी बोलीच. हे जमले नसते तर माणूस कितीही राजकारणपटू असला तरी मुख्यमंत्रीपद नसते मिळाले. व्यापक प्रमाण बोली, आणि अन्य बोली असे दोहोंचे ज्ञान असले तर फायदाच होतो, तोटा नव्हे.

**वर्ण-ध्वनिशास्त्राची व्यवस्था**

आक्षेप : तुम्ही सुरुवातीला शब्द-अनुशासनाबद्दल सांगितले. पण व्याकरणात वर्णमालेबद्दलही शिकतात ते का?

उत्तर : शास्त्र सांगताना सोयीचे जावे म्हणून एका क्रमात एकापाठोपाठ वर्ण ठेवून त्यांचा उच्चार करून सांगणे हे प्रयोजन आहे. आधीचे इतके-इतके वर्ण स्वर, त्याच्यापुढचे इतके-इतके वर्ण व्यंजने असे सांगायची सोय होते.

आणखी एक उत्तर : वर्णमाला सांगून इष्ट उच्चार कुठले ते सांगितले जाते. कोणीतरी सांगितल्याशिवाय आपल्या भाषेत थोडेच उच्चार चालतात आणि परभाषेतले सगळे उच्चार आपल्या भाषेत नाहीत ते कसे कळणार?

आक्षेप : सगळेच इष्ट उच्चार सांगायचे होते तर अतिऱ्हस्व, नाकातले स्वर, आघात केलेला स्वर हे सगळे वर्णमालेत सांगावे लागतील.

उत्तर : केवळ वर्णांची सामान्य आकृती सांगितली तरी बाकी सगळे उच्चार कळतात. 'इ' आणि 'ई' यांच्या ध्वनीची फक्त आकृती सांगितली की पुरे. ते शब्दांत अति-ऱ्हस्व किंवा खूप दीर्घ येतात, किंवा आघात करून उच्चार करावे लागले तरी वर्णाची आकृती तीच राहते. तसेच 'उ', 'ऊ' बद्दल.

आक्षेप : नुसती आकृती सांगितली तर बाकी सर्व प्रकार आपोआप सांगितले जातात असे म्हणतात, तर मग प्रामादिक उच्चारही बरोबर म्हणून सांगितले जातील. मग तसा प्रामादिक उच्चार करू नये म्हणून वेगळे वर्णमालेच्या पुढे पुन्हा तळटिपेत सांगावे लागेल.

प्रत्याक्षेप : हे 'प्रामादिक' उच्चार कुठले?

आक्षेप : 'प्रामादिक' म्हणजे बरळलेला उच्चार, एक उच्चार सुरू केल्यावर अर्धवट सोडून दुसरा उच्चार सुरू करणे, धापा टाकताना खूप नि:श्वास टाकून, किंवा खूप उथळ श्वास घेऊन केलेला उच्चार, गाताना तान घेताना वेडावाकडा केलेला उच्चार, एक ना दोन!

उत्तर : अहो, हे प्रामादिक उच्चार प्रसंगामुळे कधीकधीच चुकून तोंडातून बाहेर पडतात. भाषा शिकताना ते कोणीच शिकत नाही. त्यामुळे वर्णाची आकृती सांगितली म्हणजे हे सगळे चुकीचे उत्तर सांगितले असे होत नाही. त्या वर्णांच्या आकृतींसारखे लोक शिकतात तेच उच्चार ग्रहण केले जातात.

आक्षेप : प्रयोजन काय ते नीट सांगा : वर्णांचे सोयीस्कर क्रमात परिगणन करायचे, की इष्ट उच्चार सांगायचे?

उत्तर : दोन्ही प्रयोजने आहेत. आंब्याच्या झाडाखाली हात धुतले तर हातही स्वच्छ

होतात, आणि झाडाला पाणीही मिळते.

आक्षेप २ : लोकांनी सुरुवातीला चुकीचाच, धापा टाकताना किंवा बरळलेला उच्चार ऐकला तर? मग तुम्ही वर्णाच्या आकृती सांगा तरी त्या चुकीच्या उच्चारांचे ग्रहण होईल.

प्रत्याक्षेप : काय काय चुकीचे ऐकायला मिळणार आहे?

आक्षेप : व्याकरणात बदलताना जे तुम्ही प्रत्यय वगैरे जोडता ते.

उत्तर : प्रत्यय वगैरे आम्ही सांगूच ना - तेव्हा नीट उच्चार करून सांगू.

आक्षेप : जे बदलणार आहेत ते मूळ शब्द चुकीचे ऐकायला मिळतील.

उत्तर : जे तुमच्या शास्त्रात बदलणार आहेत ते मूळ शब्द शब्दकोशात दिले आहेत. तिथे त्यांचा निर्दोष उच्चार दिलेला आहे.

आक्षेप : बाकी काही शब्द आहेत, ते बदलत नाहीत; ते शब्द चुकीचे ऐकायला मिळतील.

उत्तर : तेही शब्द शब्दकोशात दिले आहेत. तिथे त्यांचा निर्दोष उच्चार दिलेला आहे.

**सारांश**

व्याकरणाचे नियम शिकायला सुरुवात करण्यापूर्वी कळावीत अशी या शास्त्राची मुख्य तत्त्वे या संवादात सांगितली आहेत.

१) भाषा-संवादात व्यवस्थितपणे अर्थाचा बोध करून देतात, ते शब्द होत.

२) लोकांना बोलायला आपल्या शास्त्रातले नियम लागत नाहीत, उलट आपल्या नियमांची परीक्षा ''लोक काय बोलतात'' याने करायची असते.

३) आपली बोली आपल्याला व्याकरण न शिकता येते. तरी दूरच्या मराठी लोकांशी बोलण्यासाठी, आपल्या आदल्या-पुढल्या पिढ्यांशी पुस्तकरूपाने संपर्क साधण्यासाठी, मराठीच्या जमतील तितक्या बोली (कमीतकमी प्रमाणबोली तरी) जरूर शिकाव्यात. हे आपण वावर आणि व्यासंगाने करू शकतो, किंवा भाषेच्या अभ्यासाने, आपली मर्जी.

४) व्यवस्था कशी लावावी? प्रत्यक्षात ध्वनी किरटे-बरळलेले-बोबडे, अशा असंख्य छटांचे असू शकतात. परंतु त्यांची सैद्धांतिक आदर्श रूपे, म्हणजे भाषेत वापरता येणारे वेगवेगळे 'वर्ण', हे मोजकेच असतात. शास्त्रात त्यांचे पूर्ण परिगणन करता येते.

५) शब्दरूपांची संख्या मात्र प्रचंड मोठी असते - शब्दांचे परिगणन व्यवहार्य नाही. तरी नियम आणि अपवाद सांगून या महाभांडाराची व्यवस्था आपण लावू शकतो.

मराठी भाषेचा आणि तिच्यावर प्रेम करणाऱ्यांचा उत्कर्ष होवो अशी ही या लेखाची **इतिश्री.**

**टीप :** यातील प्रश्नोत्तरांचे स्वरूप आणि तर्कप्रवाह पुष्कळसा महाभाष्यासारखात दिल्यासारखाच आहे. मात्र संस्कृत साहित्यातली प्रमाणे आणि त्या काळाला साजेसे पाप-पुण्याचे उल्लेख गाळून आधुनिक उदाहरणे आणि सभ्यतेच्या कल्पना योजल्यामुळे

मूलपाठ्यापेक्षा अनेक फरक येथे आहेत. महाभाष्याचे मूलपाठ्य, त्याच्या हिंदी किंवा मराठी भाषांतरासहित संदर्भग्रंथांतून प्राप्त होईल.

### संदर्भ


१. पतञ्जलिचे महाभाष्य, कैयटाच्या 'प्रदीप' संस्कृतटीकेसह आणि आचार्य मधुसूदन मिश्र यांच्या 'प्रकाश' हिंदी टीकेसह, आह्निके १-५. विद्याभवन संस्कृत ग्रंथमाला, पुष्प १३८, चौखम्बा विद्याभवन वाराणसी, द्वितीय संस्करण १९७८

२. पतञ्जलिचे महाभाष्य, मूळ आणि महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकरांचे मराठी भाषांतर. तृतीय आवृत्तीचे प्रकाशक : संस्कृत विद्या परिसंस्थान, पुणे शके १९२८


### टिपा

१. ज्ञानेश्वरी १.१९

२. उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम्।
उतो त्वस्मै तन्वं विसस्रे जायेव पत्य उशती सुवासाः।। ऋग्वेद १०.७१.४
(ही ऋचा 'भाषा आणि जीवन'च्या पहिल्या अंकातील संपादकीयामध्ये उद्धृत केलेली होती.)

३. एकाच सोन्यासारख्या कंठस्वरातून कधी 'बैल', तर कधी 'घोडं' असे वेगवेगळे आभूषणांसारखे आकार तयार होतात. पण या ठिकाणच्या 'बैल'चा आकार आणि दुसऱ्या कोणाच्या कंठस्वरातून बाहेर पडणारा 'बैल'चा आकार एकच. तसाच दोन्ही कंठांच्या स्वरातून बाहेर पडणाऱ्या 'घोडं'चा आकार एकच.




साहायक प्राध्यापक, जॉन्स हॉप्किन्स विद्यापीठ
1830 पूर्व मॉन्युमेंट स्ट्रीट, 8028-A
बॉल्टिमोर, मेरिलँड, यू०एस०ए०
ई-पत्ता : dvaidya@jhmi.edu

# मराठी कवितेतील आधुनिकतेची परिभाषा

**हेमंत गोविंद जोगळेकर**

एसेमेसची, संगणकाची, मॉल संस्कृतीची, इंग्रजी शब्दांनी भरलेली एक नवीच भाषा आज मराठी कवितेत मोठ्या प्रमाणात वापरली जात आहे. अशा कवितांची एक लाटच किंवा लाटाच येऊन राहिल्या आहेत. या लाटा अंगावर घेऊन त्यांच्यातील आधुनिकतेची परिभाषा हाती लागते का ते पाहण्याचा प्रयत्न या लेखात करावयाचा आहे.

नितीन कुलकर्णींची एक कविता आहे.

सकाळी डोळे उघडले
वाचलो
अंथरुणातून जमिनीवर पाय ठेवले
वाचलो
चहा प्यायलो
वाचलो
पेपर वाचला
वाचलो
दिवस उघडले रात्री मिटल्या
वाचलो
वार तिथ्या सुट्ट्या वर्ष रजा प्रवास जन्म
वाचलो वाचलो वाचलो वाचलो वाचलो वाचलो

(सकाळी डोळे उघडले, **सगळं कसं अगदी सेफैनाए**)

कवितेचा निवेदक प्रत्येक क्रियेनंतर 'वाचल्याचे' सांगतो आहे. ते वाचताना आपल्याला एकदम संगणकावरही 'सेव्ह' ही कमांड आठवते. संगणकावर कुठलेही काम करताना ते पुसले जाऊ नये म्हणून पुन्हा पुन्हा सेव्ह करावे लागते. आपल्या जगण्यातही आलेली यांत्रिकता आणि असुरक्षिततेची भावना यांची एकत्र प्रचीती हा 'वाचलो' शब्द देतो. ही संगणकोत्तर भाषा आहे. म्हणजेच नवी बदललेली भाषा आहे. पण ही व्यवहाराची भाषा नाही. ज्या तऱ्हेने ती वापरलेली आहे- वाकवलेली आहे- ते केवळ कवीच करू शकतो.

संगणकाची परिभाषा आजच्या अनेक कवितांतून आपण 'वाचत वाचत वाचत.... वाचत' असतो! कवितांतून संगणकीय क्रियांचे संदर्भ कधी रोजच्या जीवनाचाच भाग बनून येतात. हेमंत दिवटे यांची एक कविता 'मी जेव्हा मेल चेक करीत असतो' अशी आहे. कधी कधी या क्रिया प्रतिमा बनतात.

अशा संगणकीय प्रतिमा जीवनाला आलेल्या यांत्रिकतेची जाणीव करून देतात. तर कधी या यांत्रिकतेत कोमल भावना हरवून गेल्याची.

पण सापडत नाही रंग डोळ्यांतला पावसाचा पेन्टब्रशमध्ये

(निरजा, 'पाऊस', **निरर्थकाचे पक्षी**)

पण बऱ्याचदा, जसे महाविद्यालयीन विद्यार्थिनीला आपण अंगावर टॅटू गोंदवून घेतले नाहीत तर आपल्याला काकूबाई म्हणतील असे वाटावे तसे आजच्या बऱ्याच कवींना संगणकाची परिभाषा आपल्या कवितेत वापरल्याखेरीज आपले कालभान सिद्ध होणार नाही असे काहीसे वाटत असावे असे वाटते.

संगणकीय परिभाषेप्रमाणे आजच्या कवितेत ई मेलची, एसेमेसची लघुशैलीही वापरली जाते. जीवनाला आलेला वेग ती सूचित करते. कधी निव्वळ चावटपणाही करते. सलील वाघांसारखे कवी त्यासाठी रोमन लिपीचा, चिन्हांचा वापर करायला कचरत नाहीत.

08.14 me : > ratri bhetu jewayala javuya
08.15 you : > nako aaj nako parva jauya
08.15 me : > hhmmm....
08.15 you : > tomorrow he is flying :)
08.15 me : > gr8 :)

(सलील वाघ, 'चॅट', **रेसकोर्स आणि इतर कविता**)

महानगरांत जसे प्रत्येक उपनगरात मॉल्स उगवले आहेत तसे ते कवितेतही उगवले आहेत. ते जागतिकीकरण, आर्थिक उदारीकरण, बाजारीकरणाचे प्रतीक झाले आहेत. प्रत्येक गोष्टीचे झालेले बाजारीकरण आणि चंगळवादी जीवनशैलीचा उपहास करण्यासाठी सलील वाघ स्मशानवाटिका डॉट कॉम खोलतात.

स्मशानवाटिका डॉट कॉम सेंट्रलाईज एसी
अद्ययावत पाचशे प्रेते
जाळायची सोय बचेकंपनीसाठी
हॉर्सराईड रपेट क्लोज सर्किट टिव्ही
जेष्ठ नागरिकांना पिकप फ्री
स्मशानकँपसमध्येच अम्यूजमेंट पार्क क्लबहाऊस स्पा
ब्युटीपार्लर योगापॅसेज सोनाबाथ गेटटूगेदरची सोय
प्रकाशयोजना आणि दुःखधूनयुक्त टचस्क्रीन
ऑटो संगीत शोकाहॉल एनाराय बीटेक भटजी
निर्गुणी श्लोक अस्थी लगेच मिळणार दोन
प्रेतांवर एक अंत्यसंस्कार फ्री हिरव्यागार
वनराईने वेढलेले निसर्गरम्य पिंडाला लव्हबर्ड्स शिवणार

दुमजली कारपार्किंगची सोय इष्टमित्र आप्तेष्टांना बोटिंगची
सोय कवटी फुटेपर्यंत थांबायला नको ऑनलाईन रेकॉर्डिंग
तासात डिव्हिडी कुरिअरने हाडे चोवीस तासात घरपोच
स्वागतपेय मेंदी ज्योतिषी फेंगशुई सिक्ससिग्मा
आएसो सर्टिफाईड स्मशानपार्क
ऑनलाईन बुकींग चोवीसतास
क्रेडिटकार्ड स्वीकारतो
· साईटव्हिजिट आजच बुक करा
स्मशानपॅरेडाईज डॉट कॉम पाचशे प्रेतांचा उंबरा

**(रेसकोर्स आणि इतर कविता)**

बाजारीकरणाचा, जाहिरातबाजीचा आणि वेगवेगळ्या वस्तूंच्या ब्रँड्सचा होणारा मारा यामध्ये होणारा आपल्या स्वातंत्र्याचा संकोच आणि हरवणारी नैसर्गिकता हेमंत दिवटे अशी व्यक्त करतात :

कॉम्प्लेक्सच्या गार्डनमध्ये फिरताना
मी सहज मित्राला म्हटलं
अरे, गर्द पिवळ्या रंगाची
छोटी फुलपाखरं
दिसतच नाहीत हल्ली
तर तो सहजच म्हणाला,
तो ब्रॅण्ड आता बंद झालाय!

('फुलपाखरे', **थांबताच येत नाही.**)

कवितेच्या भाषेत दिसणारा आणखी एक लक्षणीय बदल म्हणजे कालपर्यंत असभ्य मानल्या गेलेल्या शब्दांचा उपयोग, शिव्या आणि लैंगिक क्रियांचा उघड उघड उल्लेख. मर्ढेकरांनी, त्यांच्या काळात, आपल्या कवितेत

सरबतवाला-
''अजुनि चालतोंचि वाट माल हा खपेना;
विश्रांति-स्तन कोठें घ्यायचा....''
- गिरगावात

असे लिहिले तर त्यांच्यावर अश्लीलतेचा खटला भरला गेला. आचार्य जावडेकरांना न्यायालयात साक्ष देऊन 'स्तन घेणे किंवा देणे' चा अर्थ मुलाला पाजणे असा सोज्वळ आहे, असा बचाव करावा लागला होता.

अनोळखी स्त्रीच्या उराकडे पाहणाऱ्याची गणना मर्ढेकर 'पापी' लोकांत करतात.

जशि पाप्याची नजर फिरावी
अनोळखीच्या उरावरूनी,
ह्या साऱ्यांची भेकड वृत्ती
वावरते तशि जगण्यामधुनी

('सरबतवाला', **मर्ढेकरांची कविता**)

आजच्या कवितेत मात्र, सलील वाघ

ठुमकत रांड चाले गांड टेचात हाले
फुदकत बॉल डोले मादीचा होले होले

('रेसकोर्स नऊ', **रेसकोर्स आणि इतर कविता**)

असे कुठलाही अपराधभाव न बाळगता म्हणू शकतात. नामदेव ढसाळांनी जेव्हा 'मुंबई, मुंबई माझ्या प्रिय रांडे' अशी कविता लिहिली तेव्हा त्यांना प्रस्थापित कवितेत आणि समाज व्यवस्थेत बंडखोरी करायची होती.

लक्ष्मी । सरस्वती पक्षपाती रांडा
आम्ही या म्हटलो त्या आल्या नाहीत
आमच्या खाली निजा म्हटलो
त्या निजल्या नाहीत

(नामदेव ढसाळ, **खेळ**)

असे म्हणताना पावित्र्यविडंबनाचा पवित्रा घ्यायचा होता. आजच्या कवींच्या कवितेतले लैंगिक उल्लेख मात्र असे धक्का देण्याच्या उद्देशाने येत नाहीत. हेच आजचे सामाजिक वास्तव आहे असे त्यांना म्हणायचे असते. कवितेत परस्त्रीच्या उराकडे पाहताना त्यांना संकोच वाटत नाही. कॉर्पोरेट जगातील स्त्रीचाच त्यांनी तिकडे पाहावे असा हेतू असतो असे स्पष्टीकरण ते देतात.

खेळीमेळीचे
खुसखुशीत स्तनडग्गे
कलिगीण उघडून
टॉपलॅप प्रेसेंटेशन

(सलील वाघ, 'बच्चे लोक', **रेसकोर्स आणि इतर कविता**)

लैंगिक क्रियांप्रमाणेच इतर अर्वाच्य समजल्या जाणाऱ्या गोष्टींचे उघड उल्लेख कविता करीत राहतात. कवितेच्या निवेदकाचा आणि कवितेचा खुलेपणा त्यांना प्रतीत करायचा असतो.

आपल्याला टेन्शन, फुसकी मारू की खोकत पादू

(हेमंत दिवटे, 'लोक रस्त्यावर', **थांबताच येत नाही**)

कवितेत पुढे काय होणार याचे आपल्यालाच टेन्शन यावे!

कधी असह्य वास्तव कवितेच्या निवेदकाला बीभत्सतेकडे नेते. वर्जेश सोलंकी यांच्या 'बाबा कॅन्सर व कविता' या कवितेतल्या निवेदकाला बाबांचे येऊ घातलेले मरण इतके निराधार करते की तो बीभत्स भाषेचा आधार घेतो.

इतकी वर्षं सोबत असलेले बाबा
असणार असतात आता दोनच महिने
दोन महिन्यांनंतर आम्ही असणार असतो बाबांशिवायचे
आई नेसणार असते पांढरी साडी
राहिलेले दिवस तिला काढावे लागणार असतात एकटीनेच
गुपचूप गर्दीत पादण्याइतकंच सहज असतं
शरीराचं चिडिचूप निघून जाणं
शरीर नावाचा घटक उडून जाणार असतो डांबरी गोळ्यांसारखा
शरीर : चॉकलेट खाऊन फेकून दिलेल्या वेष्टनाइतकंच निरूपद्रवी थुंकीइतकंच ओंगळ

**(तत पप)**

कवितेची भाषा अशी बदलत असते. कवितेच्या गरजेप्रमाणे, कवितेच्या निवेदकाच्या व्यक्तिमत्त्वाप्रमाणे, कालाप्रमाणे. आजच्या कवितेला जे प्रतीत करून द्यायचे आहे, ते प्रतीत होण्यासाठी कालची वापरून गुळगुळीत झालेली भाषा पुरी पडणार नव्हती. त्यासाठी नवी भाषा घडवण्याची गरज होती. नव्या प्रतिभावंत कवींनी कधी ती हेतुपुरस्सर घडवली. कधी ती त्यांच्याही नकळत घडली. कधी ती येणाऱ्यांसाठी रस्ता झाली.

आजच्या काव्यभाषेत दिसणारे, प्रमुख प्रवाह म्हणजे उच्चारानुसार बोलीभाषा, संगणक, एसेमेस, इंटरनेट, ईमेल ची भाषा, मॉल संस्कृतीची भाषा आणि तथाकथित असभ्य भाषा. हे प्रवाहच आजच्या मराठी कवितेतील आधुनिकतेची परिभाषा झाले आहेत. पण प्रवाहांचे महत्त्व त्यांच्या प्रवाहीपणात असते. ते जेव्हा स्थिरावतात तेव्हा नव्या वाटा फोडाव्या लागतात. येणाऱ्या काळातले नवे कवी ही आजची परिभाषा डिलीट करून, तिच्या जागी आपल्या काळाच्या जाणिवा प्रतीत करणारी नवी भाषा इन्स्टॉल करतील. ही एक सतत चालणारी प्रक्रिया आहे. मराठी कवितेची ज्ञात परंपरा सातशे वर्षांची आहे. या सातशे वर्षांत भाषेत बदल होत आलेच आहेत. कवितेसारख्या संवेदनशील साहित्यप्रकारच्या भाषेत हे बदलही वेगळ्या तऱ्हेने होतात. कवितेच्या भाषेच्या पावलांचा आवाज ऐकायला फार सजग व्हावे लागते. 'मराठी भाषेची सप्तशती' रचू पाहणाऱ्या सलील वाघांच्या कवितेतले, आधुनिक परिभाषेतले, अवतरण देतो आणि थांबतो.

मी गप्प बसलोय पिन ड्रॉप
भाषेच्या पावलांचा आवाज
ऐकू येतोय आता (नीरव)
मला बोलता येत नाही

शंभर शब्दांचं कारंजं
वर उसळून येतं
तोंडातून शब्द फुटत नाही
शेकडो वाक्यसंभावनांचे पीळ तिढा देतात
तोंडातून शब्द फुटत नाही

भाषेच्या मज्जातंतूवर डायरेक्ट
चुकून हात पडलाय माझा
चारशेचाळीस व्होल्टची सतार
कोसळतीय मेंदूच्या काळोखात

भाषेच्या गुप्तांगावर
माजलंय माझ्या
कवितेचं रान
माझ्या कवितेची मुळी थेट
ज्ञानेशाच्या नरडीला लागलीय इथून

('मराठी भाषेची सप्तशती', **रेसकोर्स आणि इतर कविता**)

■

हेमलता, 917/19 सी, फर्ग्युसन कॉलेज रस्ता, पुणे 411 004
स्थिरभाष : (020) 2565 5321, चलभाष : 094235 82565
ई-पत्ता : hemantjoglekar@yahoo.co.in

## मराठी ग्रंथप्रकाशनाची वाटचाल

ग्रंथप्रकाशन व्यवसायाला स्वभावत:च आर्थिक आणि सांस्कृतिक अशा दोन बाजू आहेत. व्यवसाय किती कार्यक्षमतेने व सुविहित पद्धतीने चालवला जातो, याबद्दलचा विचार ही आर्थिक बाजू आणि व्यवसायातील निर्मितीचा गुणात्मक व सामाजिक अंगाने केलेला विचार ही सांस्कृतिक बाजू, असे ढोबळमानाने म्हणता येईल. पहिल्या शंभर-सव्वाशे वर्षांतील बऱ्याच प्रकाशकांकडून व्यवसायाच्या आर्थिक बाजूकडे दुर्लक्ष झाले. सामाजिक प्रबोधनाच्या कर्तव्याचाच मुख्यत: त्यांनी विचार केला. परिणामी उद्दिष्ट साधण्याचे त्यांचे प्रयत्न चालू राहू शकले नाहीत. या व्यवसायाच्या आर्थिक व सांस्कृतिक या दोन्ही बाजूंचे संतुलन सांभाळत ग्रंथप्रकाशन संस्था टिकून राहिल्या आणि या व्यवसायाचा विकास होत राहिला, तर खऱ्या अर्थाने मराठी समाजात ग्रंथसंस्कृती रुजली, १८०५ साली सुरू झालेली मराठी ग्रंथप्रकाशनाची वाटचाल सार्थ ठरली, असे म्हणता येईल. हे घडून येईल, अशी आशा बाळगावी, अशी आजची परिस्थिती आहे.

शरद गोगटे, 'मराठी ग्रंथप्रकाशनाची २०० वर्षे'. पृ० ४५०

# सुरगाणा तालुक्यातील आदिवासी भाषेचे वेगळेपण

**के०आर० आढाव**

महाराष्ट्रात आदिवासींच्या एकूण ४७ जमाती असून त्यांचे विविध प्रदेशांत आजही वास्तव्य आहे. महाराष्ट्रात महादेव कोळी, भिल्ल, ठाकर, वारली, गोंड व कोकणा ह्या जमातींचे वास्तव्य मोठ्या प्रमाणावर आहे. या प्रत्येक जमातीचे सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक जीवन, धार्मिकता, रूढी, परंपरा, राहणीमान, बोलीभाषा यांच्यात विविधता आढळते.

नाशिक जिल्ह्यातील सुरगाणा तालुका हा महाराष्ट्र व गुजराथच्या सरहद्दीवर आहे. या तालुक्यात वारली, महादेव कोळी, कोळी, कोकणा, या जमातींचे वास्तव्य आहे. आजही त्यांचे वास्तव्य डोंगरकपारीत, दऱ्याखोऱ्यांत, माळरानावर, पाड्यावर व दुर्गम भागात आहे. हजारो वर्षे लोटून गेली तरी ह्या जमातींनी आपले सांस्कृतिक वैभव व भाषिक वैभव आजही टिकवून ठेवले आहे. त्यांनी त्यांची लोकगीते, लोककथा, लोककथागीते, लोककला, पोवाडे, म्हणी, वाक्प्रचार, उखाणे इत्यादींचे जतन केले आहे. नाशिक जिल्ह्यात स्थलपरत्वे आदिवासींच्या बोलीभाषेचे वेगळेपण जाणवते. पेठ तालुक्यातील कोकणी भाषा ही खास कोकणी भाषा समजली जाते. दिंडोरी तालुक्यातील आदिवासी मराठी भाषा बोलतात. कळवण तालुक्यातील आदिवासींच्या भाषेवर अहिराणी भाषेचा प्रभाव जाणवतो. सुरगाणा तालुक्यातील आदिवासींच्या भाषेवर डांगी भाषेचा प्रभाव असल्याचे जाणवते.

तालुका संपूर्ण आदिवासी असल्याने प्रमाण-भाषा आणि तेथील आदिवासींची खास बोलीभाषा यांमध्ये वेगळेपण आढळते. त्यांचे लोकजीवन वैशिष्ट्यपूर्ण असून त्यामध्ये पेहराव, जन्मविधी, मृत्युविधी, सण-उत्सव, नामकरणविधी, आहार व जावळ काढणे, विविध कला इत्यादींचे आजही महत्त्वपूर्ण स्थान आहे. विविध विधी पार पाडत असताना त्यांच्या खास बोलीतील शब्द वापरले जातात. लोकगीते, लोककथा, उखाणे हे तर बोलीभाषेतून व्यक्त होतात. त्यातूनच त्या त्या शब्दांचे अर्थही समजतात. आदिवासींच्या लहान-लहान वस्त्यांना 'पाडा' किंवा 'पाडे' असे म्हणतात. परंतु बिगर आदिवासी भागात यासाठी 'वाडी' हा शब्द वापरला जातो.

आजही आदिवासी स्त्रिया नववारी लुगड्याचे दोन समान भाग करून त्यांपैकी एकच तुकडा एकाच वेळी कमरेखाली नेसतात. त्यास 'धांदुक' हा शब्द वापरला जातो. परंतु आजही ग्रामीण भागात अर्धे लुगड्यास 'चिंधी' किंवा 'चिंदुक' असा शब्दप्रयोग केला जातो. डोक्यावर ३ फूट रुंद आणि ५ फूट लांबीचे रंगीबेरंगी वस्त्र परिधान केले जाते त्यास 'फडकी' असे म्हटले जाते. प्रमाण-भाषेत कपड्यापासून काढलेल्या तुकड्याला 'फडके'

म्हणतात. या दोन्ही शब्दांत साधर्म्य आढळते. ही स्त्रियांची पारंपरिक वेशभूषा आदिवासीपणाची निर्देशक मानली जाते.

आदिवासी स्त्री बाळंतीण झाल्यावर पाचव्या दिवशी 'पाचोरा' विधी साजरा करतात. प्रमाणभाषेत त्यासाठी 'पाचवी' हा शब्द वापरला जातो. बाराव्या दिवशी 'बारसा' विधी केला जातो, त्यासाठी प्रमाणभाषेत 'बारसे' अशा शब्द वापरला जातो.

आदिवासी समाजात परंपरेने बाळाचा जन्म ज्या वारास येतो, त्या वारास अनुसरून बाळाचे नाव ठेवले जाते. काही जुन्या व वयोवृद्ध लोकांची अशाच प्रकारची नावे दिसून येतात.

| **वार** | **मुलगा** | **मुलगी** |
|---|---|---|
| सोमवार | सोमा, सोम्या, सोमनाथ | सोमी, सोमाबाई |
| मंगळवार | मंगळू, मंगळ्या | मंगळी |
| बुधवार | बुध्या | बुधी |
| गुरुवार | दत्तू, दत्तात्रय | पारू |
| शुक्रवार | सक्रू, सुकर | सुकरी |
| रविवार | रामदास, रवी | राजी |

**रंग/रूप/स्वभावानुसार**

| | | |
|---|---|---|
| काळा रंग | काळू, काळ्या | काळी |
| गोरा रंग | धवळ्या | धवळी |

अशी आदिवासींची वैशिष्ट्यपूर्ण नावे दिसून येतात.

आदिवासी समाजामध्ये सर्वसाधारणपणे मूल वर्षाचे झाल्यानंतर जावळ काढण्याची प्रथा असून त्यासाठी मुलाच्या मामाला बोलाविले जाते. मुलाचे जावळ काढल्यानंतर मामाला २०-२५ रुपये, टोपी व टॉवेल दिला जातो. त्यास 'खोशारा' म्हणतात.

मृत्युविधीशी निगडित असे खास आदिवासी शब्द आलेले आहेत. रात्री एखादी व्यक्ती मरण पावली तर सकाळपर्यंत कथाकरी 'थाळा' गाण्यावर सकाळपर्यंत कथा सादर करतो त्यास 'रातवा' असे म्हणतात. त्याला प्रमाणभाषेत 'जागरण' असे म्हणतात. उखळात भात एकदाच कांडून पाखडून शिजवतात. त्यास 'सांबोळ' म्हणतात. मृत व्यक्तीसाठी सांबोळ शिजवतात व त्यातील पाणी काढून देहास आंघोळ घालतात. प्रेत विसाव्यापर्यंत नेतात त्यास 'इसुना' म्हणतात. प्रमाणभाषेत 'विसावा' म्हटले जाते. त्यानंतर प्रेत 'भुतकडी'कडे नेले जाते, त्यास प्रमाणभाषेत 'स्मशानभूमी' शब्द वापरला जातो. दहाव्या दिवशी दहावा विधी पार पाडण्यासाठी 'शाकुची चानकी' तयार केली जाते, त्यास प्रमाण-भाषेत 'अंड्याची भाकरी' म्हटले जाते. स्मशानभूमीतील विधी झाल्यानंतर घरातील प्रमुख व्यक्ती चुलीत भात, तुरीची डाळ, तूप, दारू टाकतो त्यास 'अंगारी टाकणे' म्हणतात.

नागलीला प्रमाणभाषेत 'नाचणी' असा शब्दप्रयोग केला जातो. संध्याकाळी नागलीचे

पीठ कालवून एखाद्या मडक्यात रात्रभर ठेवून सकाळी उकळून, थंड झाल्यावर 'आंबील' पितात. एखादा पदार्थ बनविण्यासाठी अगोदर त्याचे पीठ भिजत ठेवले जाते त्यास 'आंबवणे' असे म्हटले जाते. दोन्ही शब्दांत साधर्म्य आढळते.

दारिद्र्यामुळे लग्नाची ऐपत नसल्याने साखरपुड्यासारखा छोटा विधी केला जातो आणि नवरीला नवऱ्याच्या घरी नांदावयास पाठविले जाते. त्यास 'पेन' किंवा 'चांदला' म्हणतात.

आदिवासींनी हजारो वर्षांपासून आजतागायत आपले कौशल्य टिकवून ठेवले आहे. त्यात हस्तकला, नृत्यकला, संगीतकला, लाकडावरील कोरीव काम व घरगुती वापरावयाच्या वस्तू, दगडापासून तयार केलेल्या देवतांच्या मूर्ती इत्यादींचा समावेश होतो.

ससे पकडण्यासाठी जाळी तयार केली जाते त्यास 'वाघूर' म्हणतात. तर आदिवासी भाषेत 'वाघर' असा शब्दप्रयोग केला जातो. अनेक साधने बांबू, वेल, पाने इत्यादीपासून बनविली जातात. त्या साधनांना बोलीभाषेत खास शब्द आहेत. खेकडा पकडण्याचे साधन - मळा, छोटे मासे पकडण्याचे साधन - मळी, पावसाळ्यात धान्य वाळविण्यासाठी सुपापेक्षा मोठे साधन - उतीव, पुरातील मासे पकडण्याचे साधन - वाना, पालापाचोळा वाहण्यासाठी केलेले साधन- 'झिला', घराच्या कोपऱ्यात कोंबडीला अंडी घालण्यासाठी केलेले साधन-कोळजा, शेण टाकण्यासाठी-शेणगुला, पावसाळ्यात अंगावर घेण्यासाठी केलेले साधन - घोंगडा, दळण करण्याचे साधन - 'घरटे' (प्रमाणभाषेत 'जाते'). धान्य कांडण्यासाठी पाच फुटाचे लाकडापासून केलेले साधन - मुसळ, धान्य साठविण्यासाठी (७/८ पोती) तयार केलेले साधन - मुसकी, कमी धान्य साठविण्यासाठी केलेले साधन 'भोते', भाकरी ठेवण्यासाठी - डालकी, घरात पदार्थ ठेवण्यासाठी टांगून ठेवलेले साधन - 'शिका'. (प्रमाणभाषेत 'शिंके')

नातेवाइकांसाठी खास बोलीभाषेतील शब्दांचे उपयोजन केले जाते, जसे डोसी - म्हातारी, डवर-म्हातारा, पोसा-मुलगा, पोसी-मुलगी, मामास-मामा, मामीस - मामी, काकास- काकी, सासूस - सासू, दाजीस - मेव्हणा, बांडगा, तरुण, बांडगी-तरुणी इत्यादी खास बोलीभाषेतील शब्द व्यवहारात वापरले जातात. आदिवासींच्या लोकजीवनात उखाणे, म्हणी व वाक्प्रचार यांना महत्त्वपूर्ण स्थान असून प्रसंगानुरूप त्याचा वापर करण्यात येतो.

'उखाणा' या शब्दाला आदिवासींमध्ये 'घुड' किंवा 'आगा' असा प्रतिशब्द आहे. त्यांच्या गद्य-पद्य उखाण्यात नाद, ताल, यमक, अनुप्रास व भाषिक सौंदर्य जाणवते. आदिवासी स्त्रियांची भाषाही वैशिष्ट्यपूर्ण आढळते. स्त्रिया 'मी जातो', 'मी येतो', 'मी होडाक काम क्या' अशा पुरुषवाचक क्रियापदांचा वापर करतात. आदिवासी स्त्रिया समाजातील प्रतिष्ठित व्यक्तींचा किंवा वयोवृद्ध लोकांचाही 'तो मोत्या' 'तो जेठूस', 'तो डवर बहास' (आजोबा) असा एकेरी उल्लेख करतात.

---

खावला-खाणे, जावला-जाणे, आनास-येणे, दवडलास-पाठविणे, पिवला-पिणे ही क्रियापदे बोलीभाषेत आहेत.

■

कला व वाणिज्य महाविद्यालय, वणी
ता० दिंडोरी जि० नाशिक
चलभाष : 098505 13302

प्रत्येक कालामध्ये मुख्य भाषेच्या उपभाषा जरी पुष्कळ असल्या, प्रत्येक प्रांतागणिक जरी निराळी भाषा रूढ असली तरी सर्वसामान्य म्हणून एक भाषा असते व ती काही कारणांनी ठरत असते. अशी जी नमुनेदार भाषा म्हणून ठरते ती सर्व उपभाषीयांना समजते. कधी कधी मध्यवर्तिनी जी भाषा तीच ही शिष्टभाषा ठरते. उदा० सध्याची पुण्याची मराठी. कधी कधी एकादी उपभाषा आपल्या गुणांमुळे नमुनेदार अशी शिष्टभाषा ठरते. उदा० यादवकालीन विदर्भातील भाषा. कधी कधी समाजातील एखादा घटक जर संस्कृतीमध्ये इतर घटकांपेक्षा जास्त संपन्न झाला तर त्या घटकाचीच भाषा शिष्टभाषा म्हणून ठरते. उदा० महाराष्ट्रातील ब्राह्मणांची जी शिष्टभाषा बनली ती केवळ ब्राह्मणांच्या संस्कृतीमुळेच. एवढी गोष्ट मात्र खरी की अशी जी शिष्टभाषा बनते, ती तिच्यात केवळ ओजस्वी अशी ग्रंथनिष्पत्ती होते म्हणूनच बनते. कोणत्याही भाषेला शिष्टत्व, सर्वमान्यत्व येण्यास ती भाषा ग्रांथिक किंवा साहित्यिक बनावी लागते. 'शब्दसृष्टीचे ईश्वर'च आपल्या मातृभाषेला सर्वमान्य अशा पदवीस चढवू शकतात.

- कृ०पां० कुलकर्णी.

*मराठी भाषा - उद्गम व विकास*





अनुक्रमणिका

# घररिघे शब्द

**शरदिनी मोहिते**

गेली शतकानुशतकं अनेकानेक प्रकारे, अनेकानेक कारणांनी मराठीत येत राहिलेले आणि दुसऱ्याच कोणत्या कोणत्या भाषांतून, बाहेरून येऊनही मराठीत चांगले मुरलेले, जणू मराठीच होऊन गेलेले, मराठीत सर्रास वापरले जात असलेले अक्षरशः शेकडो परभाषीय शब्द हा चांगलाच कुतूहलाचा विषय आहे. असे शब्द नुसते आठवले तरी आश्चर्य वाटते, आणि गंमतही वाटते. या शब्दांची मराठीला इतकी सवय होऊन गेलेली आहे की कधी कोणी आठवण करून दिली की हे शब्द मुळातले मराठी शब्द नाहीत, तर ती गोष्ट मानायला मन तयार होत नाही. आणि तरी या गोष्टीची जाणीव मनात स्पष्ट झालेली असली, म्हणजे कोणी आपल्या बोलण्यात, भाषणात, संवादात, लिहिण्यात वगैरे वारेमाप इंग्लिश किंवा हिंदी शब्द वापरले म्हणून तावातावाने तक्रार करण्यातला ताव पुष्कळशा प्रमाणात कमी होतो... आश्चर्य व्यक्त करताना कोणी 'औच' म्हटले किंवा एखाद्या मॉडेलने मांजरीप्रमाणे आवाज काढून 'वावु' म्हटले तर तिकडे थोडेफार दुर्लक्ष करायला धीर येतो....

आपली मूळ देशी मराठी माणसं निरनिराळ्या देशी-विदेशी लोकांच्या जाण्या-येण्याने, देशाटनांच्या किंवा व्यापारांच्या किंवा आक्रमणांच्या कारणांनी आपल्या आसपासच्या प्रांतातल्या, उत्तरेकडच्या, दक्षिणेकडच्या, परदेशातल्याही वेगवेगळ्या लोकांच्या संपर्कात येत राहिली, बोलत राहिली आणि त्यांच्या भाषेवर इतरही भाषांचा परिणाम होत राहिला.

आजच्या मराठीमध्ये प्राकृत, संस्कृत शब्द थोड्या फार बदलांनिशी किंवा तत्सम रूपातही हजारोंनी अस्तित्वात आहेतच. शिवाय कानडी, तेलुगु, मल्याळी, तमीळ, हिंदी, अरबी, फारसी, तुर्की, भाषांप्रमाणेच इंग्लिश, फ्रेंच, पोर्तुगीज, मलायी, मंगोलियन, चिनी, जपानी अशा कितीतरी भाषांतून शेकडो शब्द आले आहेत. अजूनही येतच आहेत... त्यांपैकी काही शब्दांकडे नजर टाकली तर आपल्या भाषिक जाणिवेत भर पडून आपले भाषिक बळ वाढेल यात शंकाच नाही. परभाषेतून येऊन आपलेच होऊन राहिलेले काही शब्द पुढे दिले आहेत.

**जपानी**

रिक्शाकिशा - आगगाडी

हाराकिरी ह (हारा = पोट + किरी = कापणे)

*शब्दसंख्या :* २

**फ्रेंच**

कोयनेल क्विनाइन

लिमलेट Limonade

*शब्दसंख्या :* २





अनुक्रमणिका

**कानडी**

(हात) माग

अंघोळ - अंग + होळ

अडकित्ता - अडके - सुपारी + कत्ती सुरी याची अडकोत्तु, अडकत्तरी अशी ही मूळ रूपे आढळतात.

अडगळ

अडनड - अडाणी

अण्णा

अनागोंदी - या नावाचे एक गाव कर्नाटकात आहे अन - हत्ती, गोंदी - गल्ली

अप्पा

उंडगा / गी - उंडिग

उंडा - गोळा

ओगराळ/ळे - ओगु- ओतणे,

ओटा / ओटु

कटाव,

कडबोळे - कोडबाळं - बैलाच्या शिंगात घालण्याचं बाळं

गंजी

गजगे

गट्टी

गडंगणेर

गडगंज

गडी - गड्डे

गदळ - गदलु

गव्हाचा सांजा - सज्जिके

गिचमीळ - गीचु- खरडणे

गिड्डा - ठेंगू

गुंडु

गुड्डु - मुलगा, शिष्य मूळ अर्थ - आपण पत्त्यातला गुलाम या अर्थानेही हा शब्द वापरतो.

गुढी - निशाण

गोंडा

गोंधळ

चपणा - डावरा चप - डावा हात

चरका - चुराकु - अतिउष्ण

चरवी

चिपळी - चिप्पळि - टाळी

चिल्लर

जख्ख - म्हातारा

डगर

डबा - डबी

डाव - वेळ, पाळी

डोंगर

डोंबारी

डोणी

डोळा

ढब्बा- मोठया पोटाचा

ढब्बू पैसा

ढुड्ढाचार्य

ढुस्स

ढेकर

तिरळा

तुंबणे

तुळई

तूप - कानडी व तेलुगु तुप्प

थेर - लहर

दडणे

दमडी,

दुरडी, दुर्डी

दोडका

पाड (फळांचा)

पाले (भाजी, पल्य - पानांची भाजी)

पुरळ - पुरे - फोड

पेकाळणे - पेंकुली, बेशुद्धी

बखळ - मोकळी जागा

बुगडी (कानडी तेलुगु तमीळ)
बुटका
बुट्टी
बेगड
बेडर
बेरकी
बोंब - बुंबा देशी
बोकाणा - तोंड,
बोचके,
बोट-बोट्टू
बोडुं,
बोतरा - बोचु - दंतहीन
बोभाट,
भणंग,
भाकरी - १) बाकरी २) भास्करी
भाजी
भेंडोळे - बिंडा
मटकी - मडगी
मलबार - द्राविडी आहे
मस्त
मांडी - मांड
माडी - माड - मोठी इमारत
माळ - डोंगराळ मुलुख
मुकटा
मुस्की
मूद - भाताची वगैरे
मेट - जिना, पायरी
मेण
मेणा - बंद पालखी
मेषा
मोट - मोह - मोठा
मोड - मोड्डू
मोरी - मोरवु (का) मूरी (फा)
मोळा - मोळे - खिळा
मोळी
मोळे - खिळा
येळकोट - येळकोटी - सात किल्ले
रट्टा
रवळी
रवा
राड - राडी
रेंदा - रोंदे
रेकणे - रंके - डुरकणे
लोभान - धूप
वडार - ओडु (वडार)
विळा - इलिंग
वेड - एडु, इडु, मूर्खपणा
वेळ्ची - द्राविडी आहे
सांडगा
सुत्ताले
सुरकुतणे - सुरुकु - आखडणे
सुरळी - सुरुळी
सोंग - सोंगु
सोगा (धोतराचा वगैरे) - सोगे
सोपा, शोप - सोप्पु - बडीशेप
सोरक - गाळणारे - सोऱ्या
हुंदडणे - हुडडी
हुच - वेड, अत्यासक्ती
हुडकणे
हुरडा
हुरी- भाजलेले
हेवा
*शब्दसंख्या : १२३*

**गुजराथी**
आंगी - आंगीय, अंगडे
घुगऱ्या
चकोट - नेमका
छोकरा /री
जाफर - केसर

जायका
फई - आत्या
बकबक
वधारणे
साटाखत - साटेखत
*शब्दसंख्या : १०*

**तमीळ**
पेव - मूळ पयंकु = खळगा
*शब्दसंख्या : १*

**मल्याळी**
खोबरे - कोप्पर
मचवा - मंची पोर्तुगीज अपभ्रंश - मांचुआ
*शब्दसंख्या : २*

**तेलुगु**
लेक - मुलगा, मुलगी
*शब्दसंख्या : १*

**अरबी**
अंजीर
अक्कल
अजब
अजीजी
अत्तर /इत्र
अदालत
अदावत
अमल-अंमळ
अमीर
असल
अहवाल
आफत
आबा / सेमेटिक इंडो आर्यन
इजा
इजार - विजार
इनाम
इनामदारी
इरादा
इलाज
ऊद
औजार
औरत
कक्क - काका, चुलता
कबूल
कवायत
कसबा
कसम
कसर
कसाब
कानू
किताब
कित्त
किल्ला
किसमिस
किस्मत
कुदरत
कुरापत
कुवत
कुसूर
कैद
कैदी
कैफ
कौल
खंजीर
खंदक
खकाणा
खजिना
खजील
खतम

| | |
|---|---|
| खतरा | घमेंड |
| खप्पा | घुस्सा |
| खबर / खबरदार | चैन (हिंदी) चाबूक |
| खरीप | जकात |
| खलबत | जमा |
| खलाशी | जवाहीर जरुर |
| खवीस | जहाज |
| खाक | जामीन |
| खालसा | जारी |
| खास | जालीम |
| खासगी | जिकीर |
| खिजणे | जिगर |
| खुमारी | जिम्मा |
| खुला | जिराइत |
| खुलास - दूखलास | जिलेबी (अरबी, फारसी, हिंदी) |
| खुलासा | जिल्हा |
| खुश | जुजबी |
| खुशामत | तंबोरा - तंबूरा |
| खुशाली | तकदीर |
| खुशी | तकलुबी /पी |
| खैर | तजवीज |
| खैरात | तबक |
| ख्याल | तबला |
| गच्ची | तबेला |
| गजब | तब्बल |
| गजल / गझल | तब्येत |
| गद्दार | तमाम |
| गफलत | तमाशा मूळ अर्थ - हालचाल |
| गलिच्छ / घलिस | तरतूद |
| गाडणे | तरफ - कड |
| गाफील | तरबेज |
| गायब | तऱ्हा |
| गारत / धरत - लूट | तल्लफ / तलब |
| गुपचूप | तसदी |
| गैर | तसबीर |

| | |
|---|---|
| तहशील | फरशी |
| ताकद | फवारा |
| ताकीद | फाजील - १) हाणा २) फालतू |
| ताजा | फितणे |
| तारीख | फिरस्ता-प्रेशित |
| तालुका | फिर्याद |
| तावदान | फुशार-की |
| ताशा | फुरसत |
| तुफान | फौजदार |
| तुरा | बखर - खबर |
| दखल | बजाज - कापडाचा व्यापारी |
| दवाखाना | बरकत |
| दर्जा | बस / बास |
| दलाल | बाकी |
| दवा | बिलकुल |
| दाखला | बिलवर - बिलौर - पैलू पाडलेला |
| दावा | बुरखा |
| दुवा | बुरुज |
| देखत | मंजूर |
| दौत | मक्ता |
| दौलत | मगदूर - मक्दूर |
| नकाशा | मगरूर - मघरूर |
| नक्कल | मजल |
| नक्की | मजला |
| नखरा | मझलीस |
| नगारा - नकारा | मतलअ - पूर्व |
| नजर | मतलई - पूर्वेकडून येणारा वारा |
| नजीक | मतलबी |
| नफा | मदत |
| नसीब | मदार |
| नुक्ता | मनसुबा |
| नौबत | मनुका |
| फजीत | मनोरा |
| फतवा | मरातब |
| फन्ना | मर्जी |

| | |
|---|---|
| मलम - मरहम | मुश्कील |
| मशगूल | मुसाफिर |
| मशागत | मेहनत |
| मशाल | मेहर |
| मसलत | मेहरबानी |
| मसाला | मोघम |
| मसूदा | मोतद्दार |
| महसूल | मोताद |
| महाल | मोर्तब |
| माफ | मोसम |
| माफक | मौज |
| मायना | मौजे (खेडेगाव) |
| माल | रक्कम |
| मासला | रजा |
| माहीत (असणे) | रतीब |
| मिजास | रदबदली |
| मिरास | रद्द |
| मिळकत | राजी |
| मिष्कील | लवाजमा |
| मीनार | लवाद |
| मुकादम | लष्कर |
| मुकाबला | लिफाफा |
| मुक्काम | वकील |
| मुक्रर | वकूब |
| मुखत्यार | वजन |
| मुजरा | वजा |
| मुनीम | वजीर |
| मुन्सफ | वतन |
| मुबलक | वर्ख |
| मुरब्बी | वशीला |
| मुर्वत | वसाहत |
| मुलाकात | वसूल |
| मुलाहिजा | वस्तरा |
| मुलूख | वस्ताद |
| मुलूखगिरी | वहीम |

वाकनीस
वारस
वासलात
वाहयात
विलायत
शक
शकल
शर्थ
शान
शाहीर / शायर
शिकंदर / सिकंदर Alexander
शिकार
शेखी
शेरा
संदूक
सजा
सदरा
सनद
सफर
सफा
सबब
समई / शमअ
सल्ला
सहल
साफ
साबण / षाबुन सावून
सामील
साहेब
सुरत
सुरुवात
सुलतान
सैतान
हंबीर (राव - अमीर)
हक्क,
हजर
हजामत
हजार
हद्द
हमाल
हमी / हामी
हयात
हर - प्रत्येक
हरकत
हराम
हलवा
हलवाई
हवा
हवाई
हाल
हिकमत
हिशेब
हुकुम
हुजूर
हुज्जत
हुद्दा
हुबेहूब / हबहू
हुरूप
हैदर / वाघ
हैबत / प्रताप
हौद / हौज
हौस / हवस

*शब्दसंख्या : ३२०*

**फारसी**

अंगुस्तान - शिवण करताना सुई लागू नये म्हणून बोटाला घालण्याचे टोपण
अंदाज
अगस्त
अफरातफर
अबदागिरी - आफताब म्हणजे सूर्य गिरफ्त

| | |
|---|---|
| म्हणजे पकडणे ऊन अडवून ठेवणारे साधन अब्दागिरी | खुश |
| | खुशाल |
| अब्बा | खुश्की |
| अमोगदा (पोर्तुगीज) | खून |
| अरबी - झाई, फार्सी - बंदी | खूप |
| अलबम - चित्र मंजूषा | खेरीज |
| अहाहा / आहा! | गची |
| आगाऊ | गमजा |
| आजार | गरम |
| आबाद - वस्ती | गर्गशा |
| आबादी | गर्द |
| आम - सार्वत्रिक - आम आदमी इ० | गर्दन |
| आराम | गिर्द |
| आवंदा - औंदा / आयंदा, आइंदावरून हा ग्रामीण शब्द तयार झाला. | गुण्या - काटकोनाचा गुनिया |
| | गुदस्ता |
| कचेरी | गुन्हा |
| कबूतर | गुमान |
| कमान | गुल - काडयापेटीचे |
| करोडनूर - नखरा | गुलाब |
| कर्तबगार (हिंदूस्थानी) | घमेंड - घमंड (हिंदी) |
| कलम | घुमट - गुम्बज |
| कसोशी / कोशीश | चपाती |
| कारकून | चरस |
| काहूर / कहर | चष्मा |
| किनखाप | चाकर |
| कोता | चाबूक |
| कोरा (री, रे) मूळ अर्थ नवे मडके | चिकन (कशिदा) |
| कोहइनूर | चेहरा |
| खराब | जंगल/ली |
| खरेदी | जंबिया |
| खस (वाळलेले गवत) | जखम |
| खुबी | जर |
| खुराक | जर्द (पिवळाजर्द) |
| खुर्द - लहान | जर्दाळू |
| खुर्दा | जलद |





अनुक्रमणिका

जवान
जहर
जहाल
जागीर
जादू
जामा निमा = जामा - अंगरखा, निमा - आतली बंडी
जायबंदी
जारी
जिंदगी
जिना
जोम
जोर
जोरू
झबले
झुलुप
टोलेजंग - टोला + जंग
तंग
तक्क्या - तकिया - फकिराचे निवासस्थान
तक्ता
तपशील
तपास
तफावत
तहह्यात
ताजा
तीर
तुमान
तुर्की
तेजाब
तैनात
थोडा
दगलबाज
दगा
दम
दर
दर - भाव
दरबार
दरवाजा
दर्या
दस्त - पत्ते खेळतानाचा हात
दाणादाण - दानादाना
दाद
दारू
दालचिनी / दारचिनी
दिरंग
दिल्ली - हे नाव फारसी आहे, पण दिलपत हे पूर्वीचे नाव पृथ्वीराजाने ठेवले होते दिल्लीचे मूळ देहलीप्रस्थ असावे असेही एक मत आहे
दिवाण
दिवाणखाना
दुकान
दुनिया
दुरुस्त/स्ती
दुश्मन
दोस्त
दोस्ती
धडपा - दर्पा
धांदल
नमक
नरम - नर्म
नवाज - तबला नवाज
नाजूक
नानकटाई - नानखटाई
नामुश्की
निशाण
नूर - एकनूर आदमी
पडदा
पनीर

| | |
|---|---|
| परवानगी | बस्ता |
| परी | बस्तान |
| पसंद | बहर |
| पान (विड्याचे पान) | बहादूर |
| पायजमा | बहादूर - बहादर |
| पायपोश | बहाल |
| पुलाव | बाकी |
| पुस्ती | बाग |
| पेच | बाजार |
| पेला | बाजी |
| पेश | बाजू |
| पेशा | बारगीर - घोडा, सामान वाहणारा |
| पैजार | बारदान |
| पोशिंदा | बिलवर / बिल्लुर |
| प्यादा | बिलामत |
| प्यार | बिलोरी |
| फड, फजिती - फजीहत | बुघाज (फा) |
| फर्जंद | बुजुर्ग |
| फर्माइश | बुद्रुक |
| फर्मान | बुनियाद |
| फलाणा | बुलबुल |
| फस्त | बेगमी |
| बंदोबस्त | बेजमी |
| बगल | बेरीज / बरीज |
| बगी | बोऱ्या / बरिया पोते |
| बघणे - बगे | मखमल |
| बडतर्फ | मगज / मग्ध |
| बत्ता | मझदूर / मजूर |
| बदमाश = बद (फा) - वाईट + मआश जीवन | मझा |
| | मर्द |
| बदाम | मर्दानी |
| बरखास्त | मलिदा |
| बर्फ | मस्त |
| बर्फ | मस्ती |
| बस | महिना |

| | |
|---|---|
| मादी | शाई/सियाही |
| मालक / मालिक | शागीर्द |
| माषुक | शाब्रास |
| मिना - काचेचा मुलामा | शामियाना |
| मुजोर | शाल |
| मुडदा | शिपाई |
| मुत्सद्दी | शिफारस |
| मुद्दा | शिबंदी |
| मेज | शेरवी |
| मेजवानी | सतार |
| मेणा / मीवान | सद्दी |
| मेवा | सफेत |
| म्यान | सबनीस / सपनवीस |
| रंज - रंजीस येणे इ० | सबूर/री |
| रवाना | समशेर |
| रसद | सरज - नथीतला मोत्यांचा गोल, सरज़ाह |
| रसीद | सरबत्ती |
| रस्ता | सरबराई |
| रेशीम | सरहद्द |
| रोगण/ रौघन | सामान |
| लगाम / लिगाम | साय (दुधावरची) |
| लष्कर | साल |
| लहंगा - लुंगी | सुखार |
| लाखनूर - गहना | सुमार |
| वाहवा | सुरी |
| विमा | सुरू |
| शंखजिरा / संगजिराहव | सुलतान |
| शरम | सुस्त |
| शह | हजर |
| शहर | हजार |
| शहाजिरा | हफ्ता |
| शहानिशा | हमेशा |
| शहामत | हयात |
| शहामृग / शाहेमृग | हरकत |
| शहारा / शअर - केस | |

हिसाब
हुज्जत
हुन्नर
*शब्दसंख्या : २८८*

**चिनी**
चहा - Cha ही वस्तू व शब्दही चिनी
*शब्दसंख्या : १*

**मलायी**
साबूदाणा / सागू शब्द व वस्तूही तिकडची
गुड = गूळ हा शब्द आर्यपूर्व म्हणजे ऑस्ट्रो एशियाटिक आहे
*शब्दसंख्या : २*

**पोर्तुगीज**
अननस - हे फळ व हा शब्द दोन्ही गोष्टी ब्राझीलची देणगी - पोर्तुगीजांकडून मिळाल्या. इंग्रज/इंग्रजी पोर्तुगीज इंग्रेज वरून.
कोको ही पेरूकडची वनस्पती व शब्द पोर्तुगीजांनी आपल्याकडे आणला.
गिनी - गिनी गोल्ड, आफ्रिकेतील गिनी प्रदेशात सापडणारे सोने व नाणे पोर्तुगीजांनी आणले.
नबाब - पोर्तुगीज नबाबो, फ्रेंच नबाब व अरबी नायबचे अनेकवचन अशी मुळे सापडतात.
पाव
फर्नादीन ह Fernadez. आंब्याची एक जात आहे
बशी / बसिया, इं० बेसीन
बोंबील Bommelow
सोडत / Sort
हापूस - एक पोर्तुगीज, Alfanso याने ही जात तयार केली त्याचे नाव या आंब्याला दिले गेले, तर परेरा या पोर्तुगीजाने कलमापासून पायरी हे नाव दिले गेले
नायब - प्रतिनिधी
*शब्दसंख्या : ११*

**ब्रह्मी**
ब्रह्मी-म्यां = शीघ्र, मा = समर्थ
मूळ राष्ट्र नाम म्यां मा = समर्थ आहे ब्रह्मी बम - मा असे म्हणतात मंगोली लोकांनी हा शब्द उचलला पाळीत ब्राम-मा असा उल्लेख आहे ब्रह्मदेश हे नंतरचे संस्कृतकरण आहे!
*शब्दसंख्या : १*

**इंग्लिश**

| | |
|---|---|
| अपील | |
| आरारूट | Arrowroot |
| इंच | |
| इस्पिक/स्पेड | |
| किलावर | Club+flower |
| कोर्ट | |
| गॅझेट | |
| जाकीट/जॅकेट | |
| टेबल | |
| टोमॅटो | |
| डझन | |
| डबल | |
| डायरी | |
| ड्रम | |
| ड्रायव्हर | |
| ड्रील | |
| पास | |

पोलके Polka
पोलीस
पोस्ट
पौंड
फंड
फर्लांग
फाइल
फार्स
फूट
फॅड
फ्रॉक
फ्लो
बटण
बायकॉट
बिल
बूट
बॅट
बॉय
बॉल
बोगस
ब्लाऊज
मोटार
रिपोर्ट
रिबीट
रीबन
रीम (कागदाचे)
रूळ
रेल्वे
रोलर
लस
वार - यार्डवरून
व्हरांडा
सूटकेस
सोजीर
स्क्रू
*शब्दसंख्या :* ५२

**तुर्की**

कजाग
कुमक
खलाशी
गालिचा
चाकू
टरबूज, तर्बुज (फा)
बंदूक
बहादूर
बोगदा / बोगोज - चिंचोळी समुद्रपट्टी
बुघाज (फा) अमोगदा (पोर्तुगीज)
बोचके / बुक्का
मैना
*शब्दसंख्या :* ११

सहज जाता जाता आपण कितीतरी शब्दांची वेगळ्याच अंगांनी ओळख करून घेतली... अशीच एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे येण्याजाण्यात, भेटण्यात, राहण्यात, उठण्याबसण्यात - एकूणच मानवी व्यवहारात आपल्याकडच्याही कितीतरी शब्दांनी परभाषांमध्ये प्रवेश केला आहे.

■

ए 1/4 शरयू, सरितानगरी, फेज-2, सिंहगड रस्ता, पुणे 411 030
स्थिरभाष : (020) 2425 1353, चलभाष : 099216 08242





अनुक्रमणिका

# वर्णक्रम आणि ॅ

सुशान्त शं० देवळेकर

मराठीच्या देवनागरी लिपीत र आणि ॅ अशा दोन खुणा आढळतात. त्यांपैकी ॅ ही खूण य आणि ह ह्या व्यंजनांच्या खुणांपूर्वीच येते. आणि ऱ्य, ऱ्ह ह्या व्यंजनसंयोगाच्या खुणा आहेत असे मानले तर वाचनसंकेतानुसार ते व्यंजनसंयोग पूर्वाक्षरावर आघात आणत नाहीत असे दिसते (ऱ्हास ह्या शब्दात 'ऱ्ह'पूर्वी अक्षर नसल्याने ही कसोटी येथे लागू होणार नाही). मराठीत जिथे आकारान्त, इकारान्त, एकारान्त प्रातिपदिकांचे सामान्य रूप होताना काही प्रक्रिया होऊन इतर व्यंजनांचा 'य'शी संयोग होतो तिथेही पूर्वाक्षरावर आघात येत नाही. उदा० पुण्याचा (पुणे + आ + चा), पुण्याचा पुण्ण्याचा (पुण्य + आ + चा). मात्र इतर वेळी हा साघात-निराघात-संयोग दाखवण्यासाठी मराठी लेखनात चिन्हे उपलब्ध नाहीत.

अशा वेळी मराठी शब्द वर्णक्रमानुसार लावताना पऱ्या, पर्वा आणि पर्याय ह्या तीन शब्दांचा क्रम कसा असावा?

काही व्यक्तींना र आणि ॅ ह्या खुणा वर्णक्रमाच्या पातळीवर वेगळ्या गणाव्यात असे वाटते. र ह्यानंतर ॅ. त्यामुळे १. पर्याय, २. पर्वा, ३. पऱ्या असा क्रम त्यांनी सुचवला आहे. पर्वा ह्या शब्दाचा क्रम कोणता असेल हे वर्णक्रमात र आणि ॅ ह्या खुणांचे स्थान कोणते ह्यावर अवलंबून आहे.

प्रस्तुत लेखकाला हा क्रम १. पऱ्या, २. पर्याय, ३. पर्वा असा असावा असे वाटते. पण तो १. पर्याय, २. पर्वा, ३. पऱ्या असा असू नये असे वाटते. हे वाटण्यामागे काही गोष्टी गृहीत आहेत :

अ) मराठीचा लेखनखुणांचा क्रम हा मुख्यत्वे वर्णक्रमावर म्हणजे उच्चारावर आधारलेला आणि अपवाद म्हणून लेखनचिन्हानुसार ठरणारा (उदा० शिरोबिंदू - वेगवेगळ्या उच्चारांचा वाचक असतो) आहे.

आ) स्थान आणि प्रयत्न ह्यांनुसार वर्ण/ स्वन म्हणून पर्याय आणि पऱ्या ह्या शब्दांतील र आणि ॅ ह्यांत भेद आहे असे दिसत नाही.

इ) त्यांच्यातील भेद हा साघात-निराघात ह्या स्वरूपाचा असून तो स्वनविन्यासाच्या पातळीवरचा आहे.

ई) र आणि ॅ ह्या खुणा ह्या स्वतंत्र वर्णांच्या वाचक नसून त्यांच्या स्थानानुसार होणाऱ्या भेदाच्या वाचक आहेत. ज्याप्रमाणे आ आणि ा हे वर्णक्रमानुसार वेगवेगळे ठरत नाहीत तशाच ह्या खुणा आहेत.

ह्या संदर्भात जाणकारांना काय वाटते? ते ह्या शब्दांचा क्रम कसा लावतील? आणि तसा का लावतील?

■

डी-605, सुबोध सागर वसाहत, श्रीप्रस्थ चौथा मार्ग,
निळेमोरे, नालासोपारा (प०), ता० वसई, जि० ठाणे 401 203
ई-पत्ता : sushant.devlekar@gmail.com

### प्रकाशनक्षेत्रापुढील आव्हाने

प्रकाशनक्षेत्र वाढत आहे, हे निश्चित. आजच्या तरुण पिढीच्या मानसिकतेतून पाहिलं तर या क्षेत्राला मर्यादा आहेत असं कदाचित जाणवेल. कारण या व्यवसायाचा 'टर्नओव्हर' तुलनेने कमी आहे आणि यात प्रचंड चिकाटीची आवश्यकता आहे. त्यामानाने या क्षेत्रात व्यावसायिकता कमी आहे. बऱ्याच गोष्टी लेखक-प्रकाशक, प्रकाशक-विक्रेते यांच्या एकमेकांतील नात्यावर व विश्वासावर चालतात. त्याचप्रमाणे अनेक वेळा प्रकाशक या व्यवसायाकडे छंद म्हणूनही पाहतो. तसेच अनेक पुस्तकं ही प्रकाशकाचे विचार व आवडीनिवडी त्यांच्याशी जुळून येतात म्हणून काढली जातात. खरं म्हटलं तर हे सर्व चांगलेच गुण आहेत. निर्मितीच्या आनंदासाठी ते आवश्यकही आहेत. मात्र, व्यवसायवृद्धीकरिता प्रकाशकाच्या अंगी थोडी व्यावसायिकताही बाणायला हवी.

इंग्रजीच्या तुलनेत मराठी भाषेत वाचनसंस्कृती कमी आहे. परंतु जी आहे ती निराशाजनक निश्चितच नाही. मध्यमवर्गात आलेल्या आर्थिक सुबत्तेमुळे पुस्तकविक्री वाढली आहे. मात्र, लेखक, प्रकाशक व विक्रेते यांच्या एकत्रित प्रयत्नांनी अधिक वाचक कसे जोडले जातील व या क्षेत्राचा आवाका कसा वाढेल, याकरिता योजनाबद्ध व लक्ष्यकेंद्री प्रयत्न व्हायला हवेत. त्यामुळे सध्याच्या आर्थिक सुस्थितीचा जास्तीत जास्त लाभ घेता येईल.

रोहन चंपानेरकर. दै० लोकसत्ता, दि० २३ एप्रिल, २०११

दखलयोग्य

# तमिळला अभिजात भाषेचा दर्जा

एम० करुणानिधी, मुख्यमंत्री, तमिळनाडू

(अनुवाद - समीर परांजपे)

तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देण्यात यावा अशी मागणी तमिळी साहित्यिक तसेच तमीळ वारशाबद्दल सजग असलेल्या लोकांकडून गेल्या दीडशे वर्षांपासून करण्यात येत होती. तमीळ भाषेला समृद्ध साहित्यिक वारसा, स्वत:ची व्याकरणपद्धती, लिपी तसेच प्राचीन इतिहास आहे असे या मंडळींचे सांगणे होते. गेल्या दोन हजार वर्षांपासून तमिळनाडूमध्ये तमीळ ही भाषा बोलली जात असल्याचे अनेक पुरावेही उपलब्ध आहेत. आपले प्राचीन रूप जपत तमीळ भाषेने आधुनिक काळातील सारे बदलही सहजपणे स्वीकारले आहेत. संस्कृत, पर्शियन, अरबी भाषांना ब्रिटिश राजवटीत अभिजात भाषांचा दर्जा बहाल करण्यात आला होता व या भाषा शिकण्यासाठी व त्यांचा विकास होण्यासाठी खास उपाययोजनाही तत्कालीन सरकारने केल्या होत्या. तमीळ परंपरेवर त्या भाषकांचे असलेले निरतिशय प्रेम व तमिळी अस्मिता यांच्यामुळेच ही मागणी सातत्याने लावून धरण्यात आली होती.

तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा अशी मागणी अमेरिकेतल्या कॅलिफोर्निया विद्यापीठातील तमीळ भाषेचे तज्ज्ञ व प्राध्यापक जॉर्ज हार्ट यांनीही काही वर्षांपूर्वी केली होती. २००० साली त्यांनी एका लेखात म्हटले होते की, तमिळला प्राचीन परंपरा आहे. भारतामध्ये तमीळ ही अशी एकमेव भाषा आहे की जिची साहित्यिक परंपरा संस्कृतोद्भव नाही. संस्कृत, ग्रीक, लॅटीन, चिनी, पर्शियन, अरबी भाषांप्रमाणेच तमीळ भाषेची सांस्कृतिक व साहित्यिक परंपरा तितकीच समृद्ध आहे.

द्राविड कुळातील भाषांबाबतची वस्तुस्थिती व तमीळ भाषेचे प्राचीनत्व यासंदर्भात डॉ० रॉबर्ट काल्डवेल (१८१४-१८९१) यांनी मोलाचे संशोधन केले होते. द्राविडी भाषांमध्ये तमीळ भाषेचा संस्कृतशी सर्वांत निकट संबंध आलेला आहे. गरज भासल्यास किंवा संस्कृतकरणाविनाही तमीळ भाषा स्वबळावर आपला विकास साधू शकते असे त्यांनी म्हटले होते. मद्रास ख्रिश्चन कॉलेजमध्ये तमीळ भाषेचे प्राध्यापक असलेल्या परिथिमल कलईग्नर (व्ही०जी० सूर्यनारायण शास्त्री) यांनी सुरू केलेल्या शुद्ध तमीळ चळवळीला काल्डवेल यांच्या प्रतिपादनाचाच मुख्य आधार होता. तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देण्याच्या मागणीसाठी कलईग्नर यांनीच सर्वप्रथम रणशिंग फुंकले. त्यांच्या मागणीचा प्रख्यात तमीळ साहित्यिक मराईमलाई अडिगल (१८७६ ते

१९५०) व देवानेय पवनार यांनी सातत्याने पाठपुरावा केला. तमीळ ही जगातील महत्त्वाची अभिजात भाषा आहे या मताचे ते होते.

तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मद्रास विद्यापीठाने द्यावा अशी मागणी १९१८ साली शैव सिद्धांत समाजाने केली. तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देण्याचा मुद्दा प्रांतिक सरकारकडे उपस्थित करावा अशी मागणी १९२० साली करंथाई तमीळ संघाने मद्रास विद्यापीठाकडे केली होती. त्यानंतर बराच काळ या विषयावर काहीही हालचाल झाली नाही. मात्र 'युनेस्को कुरिअर' (तमिळ)चे संपादक मनवई मुस्तफा यांनी १९७० च्या दशकात ही मागणी पुन्हा लावून धरली. मात्र त्यांच्यामागे संघटनात्मक बळ नव्हते. तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा असे मुस्तफा १९७५ सालापासून सातत्याने वर्तमानपत्रे व मासिकांतून लिहीत होते. ही मागणी कशी योग्य आहे याचे विवेचन करणारे निवेदन आपणांस पाठवून द्यावे, असे तमिळनाडूचे तत्कालीन मुख्यमंत्री एम०जी० रामचंद्रन यांनी मनवई मुस्तफांना सांगितले होते. तमीळ ही अभिजात भाषेचा दर्जा मिळण्यासाठी कशी योग्य आहे याबाबतची सर्व माहिती गोळा करण्यास मुस्तफा यांना दोन वर्षे लागली. या माहितीच्या आधारे मुस्तफा यांनी १९८२ साली तत्कालीन मुख्यमंत्र्यांना सदर मागणीसंदर्भातील विस्तृत निवेदन सादर केले. मात्र या निवेदनावर कोणताही निर्णय घेण्यात आला नाही. ग्रीक, लॅटीन, संस्कृत भाषांप्रमाणेच तमीळ भाषेलाही अभिजात भाषेचा दर्जा दिला तर तीही या भाषांप्रमाणेच 'मृत भाषा' म्हणून ओळखली जाण्याचा धोका संभवतो असा विचार करून तमिळनाडू सरकारमधील त्या वेळच्या एका वरिष्ठ अधिकाऱ्याने मुस्तफा यांची मागणीच फेटाळून लावली होती व ही माहिती मुस्तफा यांना काही वर्षांनंतर समजली.

तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा ही मागणी दहा वर्षांपूर्वी उचलून धरल्यानंतरच तिला खरी चालना मिळाली. केंद्र सरकारच्या 'ऑफिशियल' भाषांमध्ये तमिळचा समावेश करण्यात यावा असा ठराव १९९६ साली लोकसभा निवडणुका होण्याच्या काही महिने अगोदर द्रमुक पक्षाने तिरुची येथे पार पडलेल्या आपल्या अधिवेशनात संमत केला. त्या वेळी लोकसभेबरोबरच पार पडलेल्या तमिळनाडू विधानसभा निवडणुकांच्या अनुषंगाने द्रमुकने प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्यातही या ठरावाचा अंतर्भाव करण्यात आला होता. १९९८ साली केंद्रामध्ये भाजपप्रणित सरकार सत्तेवर आले. १९९९ हे संस्कृत वर्ष म्हणून जाहीर करणारा भाजप हा तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देण्यास अनुकूल असणे शक्यच नाही अशीच सर्वांची धारणा होती. भाजपप्रणित सरकारचा एक भाग असलेल्या द्रमुक पक्षाने त्या वेळीही सदर मागणी लावून धरली. ती मंजूर व्हावी यासाठी द्रमुकने उपोषण केले. हजारो पक्षकार्यकर्त्यांनी निदर्शने केली. त्यांना अटकही झाली होती. विल्लुपुरम येथे द्रमुकच्या झालेल्या अधिवेशनातही या मागणीबाबतचा ठराव संमत झाला होता. २००४ साली पार पडलेल्या लोकसभा निवडणुकांवेळी द्रमुकने प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्यात म्हटले

होते की, तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळाला तर या भाषेतील संशोधनासाठी केंद्र सरकारकडून पुरेसे आर्थिक पाठबळ मिळविणे सोपे होईल, भारत व विदेशातील विविध विद्यापीठांमध्ये तमीळ भाषेतील संशोधनासाठी विविध प्रकल्प उभारता येणे मग शक्य होईल; हा विचार डोळ्यासमोर ठेवून द्रमुकने या मागणीचा सातत्याने पाठपुरावा केला. या निवडणुकीत द्रमुकप्रणित आघाडीला उत्तम यश मिळाले. केंद्रामध्ये संयुक्त पुरोगामी आघाडीप्रणित सरकार स्थापन करण्यामागे द्रमुकचा सिंहाचा वाटा होता. तमीळ भाषेबाबतच्या मागणीचा राष्ट्रीय किमान समान कार्यक्रमात समावेश करण्यात द्रमुकला यश मिळाले. तमिळला अभिजात भाषा म्हणून मान्यता दिल्याची घोषणा तत्कालीन राष्ट्रपती ए०पी०जे० अब्दुल कलाम यांनी २००४ साली संसदेच्या संयुक्त अधिवेशनामध्ये भाषण करताना केली. कलाम हे स्वत: तमीळ भाषेचे गाढे अभ्यासक आहेत, त्यामुळे त्यांची ही घोषणा महत्त्वाची होती. हा भारतीय लोकशाही व संघराज्यीय धोरणाचा विजय होता.

अभिजात भाषा कोणत्या असाव्यात हे ठरविण्यासाठी साहित्य अकादमीने तज्ज्ञांची एक समिती नियुक्त केली होती. या समितीने ठरविलेल्या निकषांवर तमीळ भाषा पुरेपूर उतरल्याने तिला अभिजात भाषेचा दर्जा देण्यात आला असे तत्कालीन केंद्रीय माहिती व प्रसारणमंत्री ए० जयपाल रेड्डी यांनी १७ सप्टेंबर २००४ रोजी जाहीर केले. तमीळ भाषा अभिजात असल्यासंदर्भातील अधिसूचना संयुक्त पुरोगामी सरकारने १२ ऑक्टोबर २००४ रोजी जारी केली. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर अभिजात भाषेचा दर्जा मिळविणारी तमीळ ही अशा तऱ्हेने देशातील पहिली भाषा ठरली.

■

दै० लोकसत्ता, दि० १९ जून, २०१०

**‘तमीळ शिका तरच पैसे मिळतील’**

चेन्नईतही कारागिरांचे दोन प्रकार आहेत. ज्यांना तमीळ येते, अशा कारागिरांना तमीळ ठेकेदार कामावर ठेवतात. तमीळ ठेकेदारांकडे काम केले तर आम्हाला दिवसाला साडेतीनशे रुपये मिळतात. गैरतमिळ (म्हणजे हिंदी भाषक) ठेकेदाराकडे काम केले, तर मुंबईप्रमाणेच दोनशे रुपये रोजाने काम मिळते. त्यामुळे आम्हाला जास्त पैसे मिळवायचे असतील, तर तमीळ भाषा शिकावीच लागते. तमिळनाडूत येऊन मुंबईचाच भाव मिळणार असेल तर इथे येण्याचा काय उपयोग, असा सवाल सोनू उपस्थित करतो.

आशिष चांदोरकर, दै० महाराष्ट्र टाइम्स, दि० ५ एप्रिल, २०११





अनुक्रमणिका

# नवअलौकिकतावादाची कैफियत

कृष्णा चौधरी

(परीक्षित पुस्तक : लावण्ययोग - डॉ० श्यामला मुजुमदार. केशव भि० ढवळे · प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १९२. किंमत रु० १००/- प्रथम आवृत्ती २००८.)

'लावण्ययोग' हा डॉ० श्यामला मुजुमदार यांच्या वीस परीक्षणे व समीक्षालेखांचा संग्रह आहे. ज्ञानेश्वरांचा चिद्विलास, 'ज्ञानेश्वरांचा अलौकिकतावाद', 'धुंधुरमास', 'समीक्षेची क्षितिजे' इ० ग्रंथ लेखिकेच्या नावावर नमूद आहेत. लावण्ययोग म्हणजे सर्व साहित्यप्रकारात जाणवलेले सौंदर्य. 'संतकवींची सामाजिक एकरूपता' या लेखात लेखिकेचा संतकवीकडे पाहण्याचा निर्मळ व प्रसन्न दृष्टिकोन व्यक्त झालेला आहे. संतकवींच्या वाणीतील मृदुता आणि ऋजुता त्यात स्पष्ट केली असून त्यांची सर्वधर्म-समभाव दृष्टी, अंत:करणशुचिता, व आध्यात्मिक-सामाजिक धर्मसुधारणांविषयीचा उदार दृष्टिकोण विशद केलेला आहे. त्याकाळी बहुजनसमाज जपजाप्य, कर्मकांड व होमहवन इ० अंधश्रद्धेच्या कर्मकांडात गुरफटून गेला होता. संतांनी पारमार्थिक क्षेत्रात समतेचा पुरस्कार करून नैतिक जीवनाचा आधार सदाचार आहे, हे आवर्जून सांगितले. 'निवृत्तिनाथ-ज्ञानेश्वर' या लेखात गुरुशिष्यसंबंधातील अपार्थिव संवेदनशीलता उलगडून दाखविली आहे. अकराव्या अध्यायातील विश्वरूपदर्शनाची मनीषा श्रीकृष्णापुढे प्रगट करताना, अर्जुनाच्या भावविश्वातील कोवळिकतेने रेखाटलेली आंदोलने म्हणजे ज्ञानदेवांच्याच मनातील निवृत्तिनाथाबद्दलच्या हळुवार भावना असून निवृत्तिनाथांची पूजा त्यांनी अर्जुनाच्याच भक्तिभावनेने बांधलेली आहे असे प्रतिपादन केलेले आहे. गुरूकडून त्यांना साहित्यनिर्मितीचा आशीर्वाद हवा आहे. येथील गुरुशिष्यसंबंध शिवशक्तिसंबंध ठरतो. 'ज्ञानेश्वरी : निर्मिती आणि आस्वाद' आणि 'ज्ञानेश्वरांचा लावण्ययोग' हे दोन लेख डॉ० द०भि० कुलकर्णी यांच्या दोन व्याख्यानांचे शब्दांकन आहे.

द०भि० कुलकर्णी यांच्या 'प्रतीतिविश्रांती'चे समीक्षण करताना लेखिकेने ग०त्र्यं० देशपांडे यांच्या '*भारतीय साहित्यशास्त्र*' या ग्रंथाचा आधार घेतलेला आहे. अलौकिकतावादी भूमिकेतून रसानुभव हा प्रतीतिविश्रांतीचा अनुभव असतो. ज्ञानदेवांची सौंदर्यानुभूती कलाकृतीत साधारणीकरणाच्या पातळीवर व्यंग्यार्थातून व्यक्त होत असल्यामुळे ज्ञानदेव अलौकिकतावादी ठरतात. आठव्या शतकापासून शैवांनी स्पंद-त्रिक-प्रत्यभिज्ञा या संज्ञांतून साहित्यविचार मांडला. अभिनवगुप्ताने ही शैवदर्शनाची संकल्पना साहित्यशास्त्राला लावून दाखविली. विश्वातील अव्यक्त आदिशक्तीलाच ज्ञानदेव 'शिव' म्हणतात आणि नामरूपात्मक व्यक्त झालेल्या जगाला शक्ती म्हणतात. या द०भि० यांच्या मताचे विश्लेषण आहे.

द्वितीय महायुद्धोत्तर जीवनातील मानवी मूल्यांच्या झालेल्या ऱ्हासाची भावानुभूती मर्ढेकरांनी संवेदनप्रतिमांतून अन्वयात्मक शब्दांतून समर्थपणे कलात्मक पातळीवर व्यक्त केली, असे मर्ढेकरी कवितेचे विश्लेषण लेखिकेने केलेले आहे. मर्ढेकरांचा सौंदर्यवादी विचार अलौकिकतावादी असल्यामुळे व लेखिकाही अलौकिकवादी कलाविचारांची असल्यामुळे मर्ढेकरांच्या कवितेचा प्रतिभाधर्म व त्यांच्या काव्यप्रकृतीची वैशिष्ट्ये तिने मनस्वी रीतीने उलगडून दाखविलेली आहेत. 'रसचर्चेतील रसविवेचन' या लेखात डॉ० पद्माकर दादेगावकरांनी नरहर कुरुंदकरांप्रमाणे भारताला आनुवंश्य श्लोककार व आनुवंश्य आर्याकार यांच्या भाष्यावरून स्थायीपेक्षा व्यभिचारी भाव अभिप्रेत आहे, असे प्रतिपादन केलेले आहे. लेखिकेला भारतीय साहित्यशास्त्रात लौकिकवादी परिपुष्टिवाद्यांची सुखदु:खवादी परंपरा व अभिव्यक्तिवादी, केवलानंदवादी परंपरा अस्तित्वात असल्या तरी - लौकिकतावादी परंपरेपेक्षा. अभिनवगुप्ताची अलौकिकतावादी परंपरा हीच खरी भरताची वाटते. दण्डी, वामन, लोल्लट, शंकुक हे सांख्यवादी, भोज व रामचंद्र, गुणचंद्र हे लौकिकतावादी तर आनंदवर्धन भट्टतौत, भट्टनायक, अभिनवगुप्त, मम्मट, हेमचंद्र, विश्वनाथ, प्रभाकर, मधुसूदन सरस्वती व जगन्नाथ ही अलौकिकतावादी परंपरा आहे. भरताच्या मताचे पूर्वाचार्यांनी संशोधन करून, अभिनवगुप्ताने खंडनमंडन करून 'स्थायिविलक्षणो रस:।' या सूत्राच्या आधारे अलौकिकतावादाची प्रस्थापना केली. सादरीकरण व व्यंग्यार्थ शब्दातून कवीच्या प्रातिभशक्तीतून रसप्रतीती होते. यामुळेच लेखिका विचारते की रसनिर्मिती ही जर स्थायी व व्यभिचारीभावांची परिपुष्टी असेल तर ज्ञानेश्वरीतील अलौकिकतावादाचा अर्थ डॉ० दादेगावकर कसा लावणार? 'सुखदु:खात्मक रस:' या लौकिकवादी भूमिकेतून म्हणजे रती, शोक इ० स्थायीभावांच्या परिपुष्टतेतून रस कसा प्रतीत होईल? लौकिकतावादी सामाजिक शास्त्रे वस्तुवर्णनपर असतात तर सौंदर्यशास्त्र, कलास्वरूपशास्त्र आदर्शवादी असते. या ग्रंथात पौर्वात्य व पाश्चात्त्य यांचा समन्वयात्मक अभ्यास करणाऱ्या मर्ढेकर व द०भि० कुलकर्णी या समीक्षकांना लेखिकेने 'नवअलौकितावादी' असे संबोधले आहे.

काही विधानांबाबत मतभेद संभवतो. उदा० 'भारतीय साहित्यशास्त्रातील अलौकिकतावादाने सौंदर्याच्या संदर्भात पुरुषार्थनिष्ठा (जीवनमूल्ये) व आस्वाद्यमानता (सौंदर्यमूल्य) यांचा एकात्म पुरस्कार केला. डॉ० ग०त्र्यं० देशपांडे यांच्यासारख्या मेधावी पुरुषाने आस्वाद्यमानतेचे प्रतिपादन अप्रतिम केले पण पुरुषार्थनिष्ठा या मूल्याकडे पुरेसे लक्ष दिले नाही.' (पृ० १७७) ग०त्र्यं०ना साहित्यशास्त्रातील निर्मितिप्रक्रिया, आस्वादप्रक्रिया यांतून रसप्रीती-सौंदर्यप्रतीती कशी येते याचे विवेचन करावयाचे असावे. पुरुषार्थप्रधान धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचे तात्त्विक विवेचन करायचे असते तर कलास्वरूप सौंदर्यसंकल्पनेपेक्षा, रसप्रतीतीपेक्षा म्हणजे साहित्यशास्त्रापेक्षा धर्मशास्त्राची उभारणी झाली असती. तसेच 'मर्ढेकरांनी ललितकला व वाङ्मयकला यांच्यातील मूलभूत साम्यभेद अचूक विशद केले पण आशयाची आकृती व आशयातील





अनुक्रमणिका

आंतरसंघटना यांतील भेद व अशा संघटनेमध्ये दडलेली जीवनमूल्ये इ० घटकांचे सांगोपांग विवेचन केले नाही.' (पृ० १७७) मर्ढेकरांनी ललितकला व वाङ्मयकला यांतील भेद स्पष्ट केलेला आहे. ललितकला इंद्रियसंवेदनांचा लयबद्ध साक्षात प्रत्यय देणाऱ्या तर वाङ्मयकला संवेदनांचा प्रतिमांकित - प्रतिबिंबात्मक प्रत्यय देणारी. आशयाची आकृति व आशयाची आंतरसंघटना याची मर्ढेकरांना पुरेशी जाण होती. आशय व आविष्काराच्या अद्वैत, एकात्म, व्यूहात्मक, लयबंधात्मक कलाकृतीविषयी मर्ढेकर म्हणतात, ''आशयातील भावनानुभूतींतील हा घाट, ही सुसंघटना, हा फॉर्म आपणांला त्या आशयातील अथवा भावनानुभूतीतील घटकांच्या संभवनीय अनुक्रमांत आढळणार नाही. आशयातील भावनानुभूतींतील हा घाट, ही सुसंघटना हा फॉर्म आपणांला फक्त त्या आशयांतील, भावनानुभूतींतील घटकांच्या लयबद्ध रचनेतच आढळेल.'' ('सौंदर्य आणि साहित्य' पृ० १३०) भावनानुभूतीची केंद्रपूर्ण वीण म्हणजे लयबद्धता. कलाकृतीतील आशयाच्या संघटनेमध्ये अस्तित्वात असलेल्या जीवनमूल्यांचे त्यांनी सांगोपांग विवेचन केले असते तर यातून नीतिशास्त्र निर्माण झाले असते. एका संवेदनेतून अनेक विचार व अनेक विचारांमधून एक संवेदना हे विधान जीवनमूल्यांचे सांगोपांग विवेचनच आहे. आत्मनिष्ठा, तादात्म्य, कैवल्यपूर्ण मूल्यभाव व महात्मता या अवस्था जीवनमूल्यांचे सांगोपांग दर्शन घडवितात.

एकूण 'लावण्ययोग' हा कलानिर्मितीची प्रक्रिया व आस्वादाची प्रक्रिया विशद करणारा व अलौकिकतावादाचे प्रतिपादन व विश्लेषण करणारा समीक्षालेखसंग्रह आहे. खुपेरकरशास्त्री, ग०त्र्यं० देशपांडे, श्री०मा० कुलकर्णी व द०भि० कुलकर्णी यांच्या ग्रंथांतून लेखिकेची अलौकिकतावादी विचारसरणी घडत आली. भारतीय साहित्यशास्त्रात कविप्रतिभागत साधारणप्रतीती व्यंग्यार्थातून प्रतीतिविश्रांतीत परिवर्तित होते. मर्ढेकरांच्या सौंदर्यविचारात ही प्रतीती लयबंधातून अन्वयात्मक शब्दांत व्यक्त होते. नवअलौकिकतावादी समीक्षेत ध्वन्यर्थ व अन्वयात्मक शब्द हे कलाकृतीच्या निर्मितीतील साधनद्रव्ये मात्र ठरतात. उत्कृष्ट कलाकृती ही द्रव्य-माध्यम भेद ओलांडून पलीकडे जात असते. तिथे आशय आकृतीरूप व आकृती आशयरूप होत असते. भारतीय साहित्यशास्त्राने म्हणजे भरत व अभिनवगुप्ताने हा द्रव्य-माध्यम भेद ओळखला. आजच्या काळात मर्ढेकरांनी कलाकृतीनिर्मितिप्रक्रियेतील हा भेद ओळखला. यामुळेच शास्त्रशुद्ध व तात्त्विक पातळीवर या विचारवंतांनी नवअलौकितावाद मांडला. भारतीय साहित्यशास्त्र व मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र यांत काही बाबतीत एक जवळचा आंतरअनुभवबंध आहे. काही फरकही जाणवतात. अलौकिकतावादी सर्जनशील समीक्षेचा आस्वादक पातळीवर सौंदर्यविचार लेखिकेने मांडलेला आहे.

■

शिवाजीनगर, वरूड, जि० अमरावती 444 906
चलभाष 094218 25045

# राष्ट्रभाषा

प्रा० मनोहर राईलकर

श्री० वा०रा० गाणार ह्यांच्या 'एक अनुभव'चं कात्रण माझ्या संग्रहात होतं, ते 'भाषा आणि जीवन' च्या पावसाळा २०१० अंकात (२८-३) पानपूरक म्हणून प्रसिद्ध झालं. त्यावर दिवाळी २०१० अंकात (२८-४) डॉ० गो०पु० देशपांडे ह्यांचा प्रतिसाद प्रसिद्ध झाला आहे.

भारताची कोणतीच भाषा राष्ट्रभाषा नाही, हे मला माहीत आहे. घटनेनं सर्वच भाषांना राष्ट्रभाषेचा मान दिला आहे, हे मी जाणतो. पण घटनेच्या त्याच, आठव्या, अनुसूचीत इंग्रजी भाषेचा अंतर्भाव नाही, हेही बऱ्याच जणांना माहीत नाही. असं असताना तिचं इतकं माहात्म्य शिक्षितांना वाटतं की जमलेल्या नागपुरी जनतेसमोर विद्वानांना इंग्रजीतूनच बोलण्याशिवाय मार्गच दिसू नये, ह्याचं मला आश्चर्य वाटलं, लाजही वाटली. त्यातच श्री० बोनी ह्यांनी स्वत: केलेल्या हिंदी भाषणामुळं त्या विद्वानांची मानसिक गुलामी अधिकच काळीकुट्ट झाल्यासारखं मला वाटलं, इतकाच बोध मी त्या बातमीतून घेतला. राष्ट्रभाषा असावी की नसावी ह्याबद्दल आम्ही कुणीच काही म्हटलं नाही; ते श्री० बोनींनी म्हटलं आहे.

तरीही माझ्या मनात एक प्रश्न येतोच की इंग्रजीभाषक राष्ट्रांव्यतिरिक्त अन्य देशांशी आपण, म्हणजे केंद्र सरकारनं आपला पत्रव्यवहार कोणत्या भाषेत करावा? ते देश तर भारताची भाषा हिंदी असल्याचंच समजून चालले आहेत. ह्या संबंधातली आणखी एक माहिती अशी : रशियात भारताच्या पहिल्या राजदूत म्हणून गेलेल्या श्रीमती विजयालक्ष्मी पंडितांनी आपले कागदपत्र इंग्रजीत सादर केले, ते रशियन सरकारनं स्वीकारले नाहीत. 'एक तर हिंदीत नाही तर रशियन भाषेत द्यावेत,' असं त्यांनी त्यांना सुचवलं. पण त्या वेळी मराठी, बंगाली, किंवा भारतातली दुसरी कोणतीही भाषा त्यांनी सुचवली नाही, हिंदीच सुचवली, हे लक्षणीय.

श्री० बोनी आयत्या वेळी शिकून हिंदीतून बोलले नसणार, हे तर स्पष्ट आहे. म्हणजे त्यांनी हिंदीचा अभ्यास भारतात येण्यापूर्वीच केला असणार. म्हणजे हिंदीच भारताची भाषा असल्याचं रशिया अजूनही समजून चालत आहे, असं दिसतं. आमची भाषा हिंदी नाही, असं रशियाला आणि अन्य राष्ट्रांना केंद्र सरकानं कळवलं आहे की नाही मला माहीत नाही.

दुसरा प्रश्न असा की जर एका परक्या श्री० बोनींना हिंदीत दीड तास सफाईनं बोलता येतं तर, आमच्या इतक्या विद्वान व्यक्तींना ते का जमू नये? शिवाय 'अर्थातच

मी तिथं असतो, तर मराठीत बोललो असतो, एवढं मात्र म्हणतो,' असं गोपु आपल्या प्रतिसादाच्या अखेरच्या परिच्छेदात म्हणतातच. बस्स! तेच तर माझं म्हणणं आहे. तसं न्या० अभ्यंकरांना किंवा बर्धनांना का जमू नये? ही मानसिक गुलामी नव्हे तर काय?

घटनेनं इंग्रजीला स्थान दिलं आहे, असं देशपांडे म्हणतात. पण आठव्या अनुसूचीत तर ते नक्कीच नाही. मात्र, माझा आक्षेप स्वातंत्र्यातही इंग्रजीचाच वरचष्मा चालू ठेवण्यात शिक्षितांना भूषण वाटतं आणि हिंदीत, मराठीत बोलण्यात कमीपणा वाटतो, ह्याला आहे.

पण, राष्ट्रीय ज्ञानआयोगानं नुकतीच एक मोहीम हाती घेतली आहे. तिच्या प्रास्ताविकात म्हटलं आहे की, इतक्या वर्षांनंतर पाच टक्के जनतेलासुद्धा इंग्रजी समजत नाही, तेव्हा इंग्रजीतलं सर्व ज्ञानभांडार सर्व भारतीय भाषांत आणण्याची एक प्रचंड योजना (राष्ट्रीय अनुवाद मिशन) आखली आहे. पण हिंदी तर निम्म्याहून अधिक भारतीयांना कळते आणि इंग्रज येण्यापूर्वी सामान्य अशिक्षित, भारतयात्रा करणाऱ्या जनतेची संपर्कभाषा हिंदीच होती. एकनाथ महाराजांनी, रामदास स्वामींनीही हिंदीत कवनं केली आहेत. तेव्हा पाच टक्के लोकांनासुद्धा न कळणाऱ्या भाषेत आपले विद्वान बोलतात, पण बहुसंख्यांना कळणाऱ्या हिंदीत बोलायला जमत नाही, हे लांछनास्पद नव्हे का?

तिसरा मुद्दा : राष्ट्रभाषा असावी असं म्हणण्यात अशास्त्रीय काय आहे, ह्याचा उलगडा गोपुंनी केलेला मला आढळला नाही.

आता, भाषा सगळ्यांच्या डोक्यावर मारण्याबद्दलचा मुद्दा. पण 'जोवर अहिंदी प्रदेश मागणी करीत नाहीत, तोवर हिंदी लादली जाणार नाही,' असं एकामागोमाग एक तीन पंतप्रधानांनी (नेहरू, शास्त्री, इंदिरा गांधी) म्हटलं. पण परिणामी इंग्रजी तर, देशातल्या सर्वच जनतेच्या डोक्यावर मारली गेली, त्याचं काय? ते त्या तिघांपैकी कुणाच्याच लक्षात आलं नाही, हे नवल आहे. आणि त्रेसष्ट वर्षांनंतरही ती पंचाण्णव टक्के जनतेला कळत नसताना तिची मग्रूरी कमी होण्याऐवजी वाढतेच आहे; ते काम आपलीच शिक्षित, उच्चशिक्षित मंडळी अगदी मनापासून करीत आहेत. विद्वानांच्या इंग्रजी भाषणाबद्दल मला असं वाटलं, म्हणून मी ते कात्रण पानपूरक म्हणून प्रसिद्ध करण्यासाठी पाठवलं होतं.

■

'मृण्मयी', 56 जेधेनगर, बिबवेवाडी, पुणे 411 037
स्थिरभाष : (020) 2422 0566
चलभाष : 098220 67619
ई-पत्ता : railkar.m@gmail.com





अनुक्रमणिका

# १. शैली

मो०गो० धडफळे

'भाषा आणि जीवन' (हिवाळा २०११), पृ० १४वर डॉ० अशोक रा० केळकर यांचे 'शैली आणि तंत्र' हे पानपूरक वाचले. त्यांचे प्रतिपादन असे की 'शैली आणि तंत्र' या पारंपरिक भारतीय साहित्य विचारातल्या संज्ञा नाहीत. त्या अनुक्रमे 'स्टाईल' आणि 'टेक्नीक' या इंग्लिश संज्ञांना पर्याय म्हणून मराठीत स्थिर झाल्या आहेत. संस्कृतमध्ये 'शील' म्हणजे 'अनुशासनयुक्त संस्कारित अवस्था.' केळकरांच्या समजुतीप्रमाणे जनार्दन सखाराम गाडगीळ यांनी 'शैली' हा शब्द प्रथम (कदाचित भारतीय भाषांत प्रथम) स्टाईल या शब्दाला पर्याय म्हणून वापरला.

मी १९७५ साली Some Aspects of (Buddhist) Literary Criticism (Adreesh Prakashan, Bombay) हे पुस्तक लिहिले. त्याचे पहिले परिशिष्ट वाचकांनी जरूर वाचावे. Sila and style यातील विवेचन पालीसाहित्यपुरतेच मर्यादित नाही; ते संस्कृत साहित्यासही लागू पडते. सील (शील) व चरण (आ-चरण) हे दोन शब्द पालीत येतात. शीलचा ग्रीक पर्याय ethos. निद्राशील व्यक्ती (झोपाळू माणूस). 'शील'पासून शैली हा शब्द निपजला. पतञ्जलींच्या महाभाष्यावरील भर्तृहरीची 'दीपिका' ही व्याख्या वाचावी. (संपादक वि०प्र० लिमये व का०वा० अभ्यंकर पुणे १९७२, पृ० ८८) 'शीले भवा शैली' (समाधानपूर्विका प्रवृत्तिः) समाधान म्हणजे योग्य अर्थासाठी योग्य शब्दाची उपयोजना. (आधान ठेवण) बुद्धघोषाचार्याच्या विशुद्धिमार्गात (पृ० ५) हाच शब्द वापरला गेला आहे. 'शीलमेव शैली' ''स्वार्थे ष्यञ्, निपि य-लोपः।'' लॅटिनमध्ये स्टायलस हे साधननाम. कोरण्यासाठी वा लिहिण्यासाठी असलेले साधन. डॉ० केळकर फ्रेंच उत्तम जाणतात. Buffon चे यासंबंधातील अवतरण नेहमी उद्धृत करण्यात येते. Style est de I'homme même. पाली व संस्कृतात या वाक्यासाठी एकच शब्द 'शैली'. Putenham स्पष्ट करतो. "Man is but his mind and as his mind is tempered and qualified so are his speeches and language at large." (The Art of English Poesie p. 28)

भाषेतील शब्दसंहिता तीच असते; वाक्यरचनाही बहुतांशी तीच असते. तरीपण लेखकाच्या शीलानुसार (लेखनशैलीनुसार) प्रत्येकात भिन्नता, वेगळेपणा येतो. हा कालिदासीय-स्पर्श (Kalidasan touch) असे आपण म्हणतो. शैलीचे मर्म सांगणारा श्लोक असा आहे :

''त एवाक्षरविन्यासाः, ता एव पदपङ्क्तयः।

पुंसि पुंसि विशेषेण काऽपि काऽपि सरस्वती ।।''

[तीच अक्षरचना, त्याच चरणांच्या ओळी;

व्यक्तिपरत्वे (मात्र) आगळी-वेगळी (काऽपि काऽपि) भाषा.]

तंत्र शब्दही बराच प्राचीन आहे. 'तन्' हा धातू, 'ताणणे' हा त्याचा अर्थ. धोट्याने सूत (तन्तू) विणून 'पट' तयार करण्यातली 'कारागिरी'. 'कारागिरी' हा योग्य शब्द डॉ० केळकरही वापरतात. 'यम्' म्हणजे नियमन करणे. वेग वाढवणे, वेग कमी करणे, इत्यादिक 'यंत्र' करते. 'मंत्र, तंत्र, यंत्र, खनित्र' इत्यादी शब्दांमध्ये 'त्र' हा करण (साधन) वाचक प्रत्यय आहे.

## २. 'गुजर', 'बहू' इत्यादी

याच अंकात (पृ० २१ ते २७) फुला बागूल यांचाही माहितीपर लेख आहे. शब्दांच्या शक्यतो मुळाशी जाण्याचा प्रयत्न केला जावा अशी माझी धारणा आहे. गुजर (च>ज पाली विजेय्यदान > विचेय्यदान. सुत्तनिपात) गुरांना चरण्यास नेणारा गुराखी हा 'गुजर' 'गुचर' असावा. संस्कृतात 'गौ' च्या जागी 'गु' हे रूप 'तिष्ठद्गु' 'द्वि-गु' या शब्दांत हे रूप दिसते. काही गाई पिवळ्या-तांबड्या 'रोहिणी गौः' (तांबू गाय) तर काही शुभ्र-धवल असतात. बैलाला ढवळा (धवल) तर भिन्न रंगाच्या जोडीला ढवळ्या-पवळ्या (पिवळ्या) अशी नावे पडतात. 'र' हा मत्वर्थीय (Possessive) प्रत्यय आहे. मधु+र=मधुर श्री+र (शोभायुक्त) > श्लील > अश्लील. पृ० २३वर दोन शब्द आले आहेत. गुर्जरी 'बऊ' व हिंदी 'बहू' (सून). हे आजचे अर्थ आहेत. मुळात संस्कृतात वधू : पत्नी. (पाहा 'वर' व 'वधू') 'व'चा ब (वंग > बंग) 'विशेषेण भीषणः विभीषणः' > बिभीषणः उत्तरप्रदेशी हिंदी भाषक सासरा सुनेला उद्देशून ''सुनो ओ रामचन्दरकी वहू (बहू)'' असे म्हणायचा. कालांतराने मूळ पत्नीवाचक 'वहू > बहू' सून झाली. शहेर (गुर्जरी) व शहर (हिंदी) हे मूळ क्षत्र > क्षथ्र (अंमल) या अर्थाचा. अंमल गाजवणारा 'क्षत्रिय'. आजमितीसही अफगाणिस्तानात नगर+पालिका यासाठी शब्द वापरला जातो, 'शहर+वाली'. वाली म्हणजे पाली (पालन करणारी - थोडक्यात पालिका. पाहा अवमान > अपमान.) असो!

शब्दवेध बोधक आणि रंजक, असे दोन्ही असतात पण छातीठोकपणे हेच 'शब्दमूळ' आहे असे कोण सांगू शकणार? आणि जरी सांगितले तरी सर्वजण त्याचा स्वीकार कसा करणार? ■

2 'यशोदीप-ब', रामबाग वसाहत,
सदाशिव पेठ, पुणे 411 030
स्थिरभाष : (020) 2433 2081

# ‘गोंडवना लँड’चे जागतिकीकरण

एल०के० कुलकर्णी

संदर्भ : ‘भाषा आणि जीवन’च्या हिवाळा २०११च्या अंकातील ‘हिंदुस्थानची इंग्रजी भाषेला देणगी’ हा अरविंद कोल्हटकर यांचा लेख.

‘प्लेट टेक्टॉनिक्स’ हा खंडनिर्मितीसोबत भूकंप, पर्वतनिर्मिती, भूपृष्ठाची रचना इ० अनेक बाबींचे योग्य स्पष्टीकरण देणारा सिद्धांत. भूपृष्ठाची नेपथ्यरचना ठरवणाऱ्या या क्रांतिकारक सिद्धांताचा उद्गम व विकास हा एक नाट्यमय घटनाक्रम आहे. या नाट्याची नांदी भारतातच झाली.

इ०स० १८५६मध्ये त्या वेळच्या भारतीय सर्वेक्षण खात्याचे डब्लू०टी० ब्लँडफोर्ड व एच०एफ० ब्लँडफोर्ड यांना तत्कालीन ओरिसातील तालचीर येथे विशिष्ट शिलाखंड आढळले. या शिलाखंडांवर हिमनदीच्या कार्याच्या खुणा होत्या. भारतासारख्या उष्ण कटिबंधीय देशात, ध्रुवापासून एवढ्या दूरवर पूर्वी हिमनद्या होत्या हे कल्पनातीत होते. या घटनेतून भारत एकेकाळी ध्रुवाजवळ होता या कल्पनेचा पाया घातला गेला.[१] हीच कल्पना निरीक्षणे व संशोधनातून ‘भूखंड अपवहन सिद्धांताच्या’ रूपात पुढे आली व तिची परिणती ‘प्लेट टेक्टॉनिक्स’मध्ये झाली.

‘गोंडवन’ या शब्दाचा उगम अनिश्चित आहे. या संदर्भात खालील काही नोंदी उल्लेखनीय आहेत. ‘गोंडवन हे भारतातील गोंडवनबहुल डोंगराळ भागाचे ऐतिहासिक नाव आहे.’[२] ‘मध्य प्रदेशात विंध्य व गोदावरी यांच्यामधल्या भागाला गोंडवन असे नाव आहे.’[३] ‘मध्य प्रदेशातील बस्तर, छिंदवडा, मंडला जिल्हे, महाराष्ट्रातील चंद्रपूर आणि आंध्रप्रदेशातील वरंगल व आदिलाबाद जिल्ह्यांच्या प्रदेशास गोंडवन म्हणतात.’[४] ‘गोंडवन या शब्दाचा उगम अनिश्चित असला तरी अकराव्या व बाराव्या शतकातील अरबी व्यापाऱ्यांनी हा शब्द वापरात आणला यावर बहुतेक भारतीय इतिहासकारांचे एकमत आहे.’[५] ‘तेलुगू भाषेतील कोंड (म्हणजे डोंगर) यापासून डोंगरवनात राहणाऱ्या आदिवासी जमातीस गोंड किंवा कोंड (म्हणजे डोंगर) व त्यापासून ‘गोंडवन’ अशी ही या शब्दाची व्युत्पत्ती असावी.’[५]

हा शब्द भूखंड अपवहन सिद्धांतात समाविष्ट कसा झाला याचा घटनाक्रम पुढीलप्रमाणे आहे.

इ०स० १८७१मध्ये कॅप्टन फोर्सिथ यांच्या ‘हायलँडस ऑफ सेंट्रल इंडिया’ या ग्रंथात गोंडवन हा शब्द प्रथम वापरला गेला. हा ग्रंथ त्यांच्या मृत्यूनंतर प्रकाशित झाला.[६]

इ०स० १८७२मध्ये तत्कालीन सर्व्हे ऑफ इंडियाचे फ्रान्सिस फेडन यांना चंद्रपूर

जिल्ह्यात हिमानी क्रियेतून तयार झालेल्या फरसबंद्या आढळून आल्या. या पुराव्याने प्राचीन काळातील भारतातील हिमनद्यांचे अस्तित्व निर्विवादपणे सिद्ध झाले. चंद्रपूरपासून १६ किमी अंतरावर ईरई नदीच्या काठावरील हे ठिकाण आजही भारतीय व जागतिक भूगर्भअभ्यासकांचे तीर्थक्षेत्र ठरले आहे. पुढे चालून असेच खडक आफ्रिका, दक्षिण अमेरिका, ऑस्ट्रेलिया येथेही आढळून आले. 'ग्लॉसोप्टेरिस' या वनस्पतीच्या जीवाश्मांचा आढळ, हे या खडकांचे समान वैशिष्ट्य आहे. फेडन यांनी या प्रकारचे खडक गोंडवनातच प्रथम शोधले, यामुळे या खडकांच्या प्रकारांना 'गोंडवन संघ, गोंडवन माला' ही नावे देण्यात आली.[१]

हेन्री बेनेडिक्ट यांनी इ०स० १८७२मध्ये केलेल्या नोंदीत 'गोंडवन संघ खडक' हा शब्द वापरला होता, पण हे लेखन अप्रकाशित राहिले. या विशिष्ट खडकप्रकारासाठी लिखित स्वरूपात गोंडवन हा शब्द वापरून प्रकाशित केला तो ओट्टोकार फीस्टमाँटेल या वनस्पतीशास्त्रज्ञाने. ब्लँडफोर्डद्वय व श्री० मेड्लिकॉट यांचा हवाला देऊन या खडक प्रकारासाठी गोंडवन हे नाव फीस्टमॉन्टेल यांनी इ०स० १८७६मध्ये प्रस्तावित केले आणि गोंडवनाचा भूगर्भशास्त्रात अधिकृत प्रवेश झाला.[१] पुढे इ०स० १८८५मध्ये एडवर्ड सुएस यांनी 'पृथ्वीचा चेहरा' या आपल्या ग्रंथात गोंडवनी खडक आढळणाऱ्या भारत, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका व दक्षिण अमेरिका इ० प्रदेशांसाठी 'गोंडवनालँड' शब्द प्रचारात आणला. आल्फ्रेड वेजेनर यांनी इ०स० १९१२ ते १९१५मध्ये भूखंड अपवहन सिद्धांत विकसित केला. इ०स० १९१५मध्ये 'खंडाची निर्मिती' या ग्रंथात त्यांनी एडवर्ड सुएस यांचा संदर्भ देऊन गोंडवना लँड या नावासह विशाल प्राचीन महाखंडाची कल्पना मांडली.

अशा प्रकारे भारतात आजही उपेक्षित, दुर्लक्षित विकासापासून दूर असणाऱ्या गोंडांच्या भूमीचे नाव जागतिक पातळीवर गेले. प्रचंड खळबळ, वाद-प्रतिवाद, संशोधन, नवीन पुरावे व पुनर्मांडणी इ० प्रक्रियेतून वेजेनर यांचा सिद्धांत 'प्लेट टेक्टॉनिक्स'मध्ये परिणत झाला. या दरम्यान गोंडवन हा भारतीय शब्द विज्ञानाची सीमा ओलांडून जगभर विविध क्षेत्रांत कसा लोकप्रिय ठरत गेला याची काही उदाहरणे खाली दिली आहेत.

| | |
|---|---|
| गोंडवना गेम रिझर्व्ह | - दक्षिण आफ्रिकेतील जगप्रसिद्ध क्रीडाक्षेत्र |
| गोंडवना | - ट्रिस्टन म्युरेल यांची संगीतरचना |
| गोंडवना | - माइल्स डेव्हिस यांच्या पँजिया या अल्बममधील एक लोकप्रिय गाणे |
| गोंडवना १ | - ऑस्ट्रेलिया व न्यू कॅलाडोनिया यांमधील सागरी दळणवळणासाठीची केबलतार |
| गोंडवना लँड | - स्टेरॉइड मॉक्सिमस यांचा अल्बम |

'गोंडवना' या नावाने प्रसिद्ध असणारे एक गाणे युट्युबवर पन्नास लक्षहून अधिक लोकांनी पाहिले आहे.

**संदर्भ :**

१. Earthquakes, A.K.R. Hemmady, National Book Trust India.
२. Online Encyclopedia Britanica.
३. भारतीय संस्कृती कोश, पं. महादेवशास्त्री जोशी
४. मराठी विश्वकोश, खंड ५, मराठी विश्वकोशमंडळ
५. http//www.thestudy.net.au/projects/gondwananame html.

39 भाग्यनगर, नांदेड 431 606
स्थिरभाष : (02462) 26 2305
चलभाष : 094225 60436

## बदलती वाचन अभिरुची

भारतातील तरुणांच्या पुस्तक वाचनाबाबतची स्थिती जाणून घेण्यासाठी 'नॅशनल कौन्सिल ऑफ अप्लाईड इकॉनॉमिक्स रिसर्च'तर्फे पाहणी करण्यात आली. या संस्थेने १३ ते १५ वयोगटातील तरुणांच्या वाचनाविषयी जाणून घेतले. या अहवालानुसार ३३.४% हिंदी, १३.२% मराठी, ७.७% बंगाली आणि ५.३% इंग्रजी वाचनाला देशातील तरुण प्राधान्य देतात. भारतात २०० शहरांत आणि ४३२ गावांत हे सर्वेक्षण केले गेले. या सर्वेक्षणानुसार मराठी वाचकांची संख्या वाढताना दिसते आहे.

'वाचकांची संख्या वाढली आहे, पण वाचन संस्कृती वाढली का?' असा प्रश्न आज विचारला जातो आणि तो रास्तही आहे. 'कथा, कादंबरी, ललित, वैचारिक वाचन म्हणजेच खरे वाचन' असा सर्वसाधारण समज आहे. 'ज्या भाषिक समाजामध्ये ललित वाङ्मयातील उत्तम वाङ्मयकृतींना भरपूर संख्येत वाचकवर्ग मिळतो, त्या भाषिक समाजाला संपन्न वाचनसंस्कृती लाभली आहे;' असे समीक्षक डॉ० सुधीर रसाळ यांना वाटते. ते म्हणतात, 'आपल्या भाषेत वाचनसंस्कृती अविकसित राहण्याचे मुख्य कारण आपल्या संस्कृतीत वाङ्मयादी कलांना अतिशय गौण स्थान आहे. जोपर्यंत त्यांना महत्त्वाचे स्थान मिळणार नाही, तोपर्यंत वाचन-संस्कृती पूर्णपणे विकसित होऊ शकणार नाही. सध्याचे वाङ्मयीन वातावरण वाचन-संस्कृतीच्या विकासाला फारसे अनुकूल नाही. गेल्या ५० वर्षांत साक्षरतेचे प्रमाण खूपच वाढले; परंतु त्यामानाने वाचकांच्या संख्येत मात्र वाढ झाली नाही. छोट्या छोट्या गावांत महाविद्यालये निघाली आहेत, परंतु त्यांच्या ग्रंथालयांची अवस्था दयनीय आहे. आज लहानातल्या लहान खेड्यातही वाचनेच्छू पदवीधर तरुण आहेत, परंतु तेथे त्यांना वाचायला पुस्तके उपलब्ध नाहीत. साक्षरतेच्या वाढीच्या प्रमाणात ग्रंथालये वाढली नाहीत.' वाचनसंस्कृतीविषयी डॉ० सुधीर रसाळ यांनी केलेली ही टिपणी खरी आहे आणि ती समजून घेतली पाहिजे. वाचनसंस्कृतीकडे फारशा गांभीर्याने पाहिले गेले नाही, त्यामुळे आजची अवस्था आली आहे. याचाच परिणाम वाचकांची अभिरुची बदलण्याकडे झाला आहे.

श्याम देशपांडे, लोकसत्ता, २४-०४-२०११

# महाबँक पुरस्काराचे वितरण

**आनंद काटीकर**

एखाद्या विषयाच्या सखोल अभ्यासाठी लागणारी व्यापक दृष्टी दिवसेंदिवस कमी होत आहे. अशा परिस्थितीत मराठीतून भूगोलाच्या विविध संकल्पना समजावून सांगणारा कोश निर्माण करण्यासाठी एल०के० कुलकर्णी यांनी घेतलेली मेहनत खरोखरच स्तुत्य आहे. राजहंस प्रकाशनाने देखील हा ग्रंथ सिद्ध करण्यासाठी उत्तम प्रयत्न केले आहेत. शाळेत शिकवणाऱ्या शिक्षकाने घेतलेले हे कष्ट आपल्या उच्चशिक्षण क्षेत्रातील विद्यार्थी आणि प्राध्यापक यांनी पाहायला हवे, अशा शब्दांत डॉ० प्रवीण सप्तर्षी यांनी 'भूगोल कोश' या ग्रंथाचे कौतुक केले. मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने देण्यात येणाऱ्या महाबँक पुरस्कार समारंभाचे प्रमुख पाहुणे म्हणून ते बोलत होते. १४ जानेवारी २०११ रोजी भावे प्रशालेच्या सभागृहात हा कार्यक्रम झाला.

सत्काराला उत्तर देताना एल०के० कुलकर्णी म्हणाले की भूगोल कोश तयार करणे म्हणजे विनाकारण वेळ घालवणे आहे; त्याचप्रमाणे या कोशाला मागणी देखील कमी असेल असे बऱ्याच जणांचे मत होते. पण याची आवश्यकता मला मनापासून पटली होती. त्यामुळे मी काम करत गेलो. कोशाच्या निर्मितीसाठी मला माझ्या पत्नीने खूपच सहकार्य केले. तिच्या मदतीशिवाय हे काम पूर्ण झाले नसते. शाळेतील सहकारी, हितचिंतक मित्र यांनी माझ्या या कोशासाठी मौलिक सूचना केल्या. राजहंस प्रकाशनाने कोश प्रसिद्ध करण्याचे ठरवल्यावर संपादक आनंद हर्डीकर यांनी माझ्या अनेक संकल्पना स्पष्ट व्हाव्यात आणि हा कोश निर्दोष व्हावा यासाठी सतत प्रयत्न केले. त्यामुळेच हा देखणा कोश तयार झाला आणि अल्पावधीतच त्याच्या दोन आवृत्त्या निघाल्या हे माझे भाग्यच! असेही ते पुढे म्हणाले.

प्रास्ताविकपर भाषणात प्रा० प्र०ना० परांजपे यांनी महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार देताना परिषदेने यावेळी भाषा या विषयाची व्याप्ती वाढवून मराठीतून उत्तम ज्ञान देणारे लेखन अशी केली आहे असे सांगून या ग्रंथाचे आणि ग्रंथकाराचे अभिनंदन केले.

परीक्षण समितीच्या सदस्य डॉ० कलिका मेहता यांनी ग्रंथाविषयी अनेक तपशील विस्ताराने सांगितले. ज्ञान समाजापर्यंत पोहोचवायचे असेल तर ग्रंथाची भाषा उत्तम असायला हवी. हा ग्रंथ त्या निकषाला पात्र ठरला असल्याचे सांगून या कोशाच्या भाषेचे कौतुक केले. डॉ० नीलिमा गुंडी यांनी प्रमुख पाहुण्यांचा परिचय करून दिला.

कार्यक्रमात राजहंस प्रकाशनाचे संपादक आनंद हर्डीकर, महाबँक पारितोषिक समितीच्या परीक्षक डॉ० कलिका मेहता यांचा सत्कार करण्यात आला. सूत्रसंचालन प्रा० डॉ० रंजना फडके यांनी केले, तर प्रा० आनंद काटीकर यांनी आभार मानले. ■

चलभाष : 094216 10704

# संगणकावर यूनिकोड संकेतप्रणालीद्वारे मराठीचा वापर

**विजय पाध्ये**

मराठी अभ्यास परिषद व मराठी विभाग, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे ह्यांच्या संयुक्त विद्यमाने दि० २६ फेब्रुवारी २०११ रोजी संगणकावर यूनिकोड संकेतप्रणालीद्वारे मराठीचा वापर सुलभपणे कसा करता येतो ह्या विषयावर एक कार्यशाळा आयोजित करण्यात आली होती. महाविद्यालयातील विद्यार्थीवर्ग व विविध क्षेत्रांत काम करीत असलेल्या व्यक्ती असे एकूण ४८ जण ह्या कार्यक्रमात सहभागी झाले होते. राज्य मराठी विकास संस्था, मुंबई येथील संशोधन-साहाय्यक श्री० सुशान्त देवळेकर ह्यांनी यूनिकोड संकेतप्रणालीची वैशिष्ट्ये, रचना आणि जागतिक स्तरावर तसेच केंद्र शासनाकडून तिला मिळालेली मान्यता ह्याविषयी उपस्थितांना सविस्तर माहिती दिली.

परिषदेचे सहकार्यवाह आणि व्यावसायिक भाषांतरकार श्री० विजय पाध्ये ह्यांनी संगणक व महाजाल ह्यांचा विस्तृत उपयोग करून यूनिकोड संकेतप्रणालीनुसार मराठीतील काम करताना आपल्याला सुरुवातीला जाणवलेल्या समस्या, त्यांतून काढलेले मार्ग व नंतर संपादन केलेले कौशल्य, त्यातून मिळणारे विविधांगी लाभ ह्यांविषयीची माहिती दिली आणि उपस्थितांच्या शंकांचे निरसन केले.

परिषदेचे कार्यवाह प्रा० आनंद काटीकर ह्यांनी सदर विषयाचे महत्त्व व समयोचितता ओळखून कार्यशाळेचे आयोजन करण्यास मान्यता दिल्याबद्दल फर्ग्युसन महाविद्यालयाच्या मराठी विभागाचे, तसेच कार्यशाळेत सहभागी झालेल्या व्यक्तींना यूनिकोडविषयक परिपूर्ण असे मार्गदर्शन केल्याबद्दल आणि अनेक लोकांच्या मनात असलेले समज-गैरसमज दूर करून त्यांच्या शंकांचे निरसन केल्याबद्दल व त्यांना यूनिकोडची अनिवार्यता पटवून देऊन व्यावहारिक वाटचाल सुलभतेने करण्याबाबत आत्मविश्वास निर्माण करून दिल्याबद्दल श्री० देवळेकर व श्री० पाध्ये ह्यांचे आभार मानले.

कार्यशाळेच्या दुसऱ्या सत्रात सर्व उपस्थित सहभागी व्यक्तींना महाविद्यालयाच्या संगणक प्रयोगशाळेत नेऊन तेथे संगणक यूनिकोड-क्षम करून मराठीसह सर्व भारतीय भाषांसाठी कसा वापर करता येतो त्याची प्रात्यक्षिके करून घेण्यात आली व कार्यशाळेतच सर्वांना उपलब्ध करून देण्यात आलेल्या चकतीचा (सीडी) उपयोग करून विविध सॉफ्टवेअरांद्वारे केलेल्या मजकुराचे यूनिकोडमध्ये व यूनिकोडमधील मजकुराचे इतर सॉफ्टवेअरांच्या मजकुरात परिवर्तन कसे करता येते ह्याविषयीची माहिती देण्यात आली. ■

४ चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037
स्थिरभाष : (020) 2441 1951, चलभाष : 098220 31963

## साभार पोच

गोवा सरकारच्या कला व संस्कृती संचालनालयाने बोरकर जन्मशताब्दीच्या निमित्ताने प्रकाशित केलेली पुस्तके :-

१. चैत्रपुनव - बाकीबाब बोरकर जन्मशताब्दी गौरवग्रंथ. संपा० डॉ० सोमनाथ कोमारपंत. (पुठ्ठाबांधणी), पृष्ठे २०० (मोठा आकार). किंमत : अनुल्लेखित

२. बोरकर-काव्यसमीक्षा (१९३७ ते २००८) - प्रा० एस०एस० नाडकर्णी. (पुठ्ठाबांधणी), पृष्ठे ५७६. किंमत रु० ५५०/-

३. अप्रकाशित बाकीबाब - संपा० डॉ० विद्या प्रभुदेसाई, श्रीराम पांडुरंग कामत. पृष्ठे १५०. किंमत रु० १५०/-

४. बोरकरांचे छंदवैभव - मनोहर नाईक. पृष्ठे ८८. किंमत रु० १३०/-

५. बा०भ० बोरकर : साहित्यसमीक्षा - संपा० प्रा० विनय ल० बापट, श्रीराम पांडुरंग कामत. पृष्ठे २७३. किंमत रु० २५०/-

६. कौतुक तू पाहे संचिताचे (बा०भ० बोरकर यांचे आत्मचरित्र) - संपा० प्रा० अरुणा गानू, श्रीराम पांडुरंग कामत. पृष्ठे २९६. किंमत रु० ३००/-

७. आठवणीतील बोरकर - संपा० प्रा० विनय ल० बापट, श्रीराम पांडुरंग कामत. पृष्ठे ३५२. किंमत - रु० ४००/-

८. चंद्रफुलांची छत्री (बोरकरांवरील मृत्युलेख) - संपा० डॉ० विद्या प्रभुदेसाई, श्रीराम पांडुरंग कामत. पृष्ठे २३९. किंमत रु० ३००/-

९. बालकवी - बा०भ० बोरकर संदर्भसूची - प्रा० एस०एस० नाडकर्णी. पृष्ठे ११८. किंमत रु० १५०/-

(वरील सर्व पुस्तकांचे प्रकाशक - कला व संस्कृती संचालनालय, गोवा सरकार, पणजी.)

१०. मराठीच्या उच्च शिक्षणाची दशा आणि दिशा - डॉ० प्रकाश परब. मराठी अभ्यास केंद्र, ठाणे. पृष्ठे ४५. किंमत रु० ५०/-

११. माझ्या वर्तमानाची नोंद (कवितासंग्रह) पी० विठ्ठल. गोदा प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १२८. किंमत रु० १२०/-

■

## लेखक-परिचय

- **आढाव,** के०आर० : कला व वाणिज्य महाविद्यालय, दिंडोरी, (ता० वणी, जि० नाशिक) येथे मराठीचे प्राध्यापक. ''कोकणा आदिवासींच्या लोकसाहित्याचा अभ्यास'' या विषयावर पीएच०डी०
- **काटीकर,** आनंद : औषधनिर्माण निर्माणशास्त्राची पदविका. मराठीमध्ये एम०ए०. गेली आठ वर्षे मराठीचे (सध्या फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे) अध्यापन.
- **चौधरी,** कृष्णा : निवृत्त प्राध्यापक, नरेंद्र तिडके महाविद्यालय, रामटेक. साहित्य व सौंदर्यशास्त्राचे अभ्यासक. *'म० फुले : पूर्वसुरी व प्रभावळ'* आणि *'मर्ढेकरांची महात्मता'* ही पुस्तके प्रकाशित. *'झळई'* व *'श्वेतकमळ'* हे काव्यसंग्रह व दोन संपादित काव्यसंग्रह. ४०० समीक्षालेख प्रकाशित.
- **जोगळेकर,** हेमंत गोविंद : मुंबई आयआयटीमधून रासायनिक अभियांत्रिकीमध्ये पदवी. राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे येथून वरिष्ठ शास्त्रज्ञ म्हणून निवृत्त. 'होड्या' (१९८५), 'माझा(पण) बेहद्द नाममात्र घोडा' (विडंबन कविता), 'मनातले घर' (१९९५), 'उघडे पुस्तक' (२००७), हे कवितासंग्रह प्रकाशित. केशवसुत व बालकवी पुरस्कार. इंग्रजी, हिंदी, उर्दू, गुजराती, कन्नड, पंजाबी व असमिया इ० भाषांत कवितांची भाषांतरे. 'कविता दशकाची', कविता विसाव्या शतकाची', 'स्वातंत्र्योत्तर मराठी कविता - १९६० ते ८०' व 'अक्षर दिवाळी - १९८०, ८१, ८२, ८३, ८४, ८५' या प्रातिनिधिक संग्रहांत कवितांचा समावेश.
- **देवळेकर,** सुशान्त : एम०ए० (मराठी), सध्या राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) येथे कनिष्ठ संशोधन-साहाय्यक ह्या पदावर कार्यरत. २००२-०८ ह्या काळात भारतीय तंत्रज्ञान संस्था (आयआयटी) (मुंबई) येथील भारतीय भाषा केंद्रात भाषातज्ज्ञ म्हणून सेवेत. मराठी शब्दबंध हा शब्दार्थसंबंध दाखवणारा कोश, मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी रूपविश्लेषक ही संगणक प्रणाली विकसित करण्यात सहभाग. संगणकावर यूनिकोड वापरून मराठीत काम कसे करता येईल हे समजावून देणाऱ्या कार्यशाळांत मार्गदर्शन.
- **धारुरकर,** चिन्मय : एम०ए० (भाषाविज्ञान), एम०फिल०, सध्या आयआयटी (मुंबई) येथे पीएच०डी०चा अभ्यास चालू. मराठी हिंदी व इंग्रजी ह्यांव्यतिरिक्त उर्दू, फारसी, अरबी, बंगाली व तेलुगु भाषा अवगत. साहित्यसमीक्षा, तत्त्वज्ञान, वैशिष्ट्यलक्ष्यी भाषाविज्ञान, अनुवाद अध्ययन, संस्कृत व्याकरणशास्त्र इत्यादी विषयांत विशेष रुची. 'कवितारती'मधून काही कविता, तसेच भाषाविज्ञानविषयक नियतकालिकांमधून शोधनिबंध प्रसिद्ध.
- **मालशे,** डॉ० मिलिंद : आयआयटी पवई (मुंबई)मध्ये इंग्रजीचे प्रोफेसर. मराठी व इंग्रजीमधून लेखन. सौंदर्यशास्त्राचेही अध्यापन,'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन' हे पुस्तक व अनेक भाषांतरे प्रकाशित. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक.
- **मोहिते,** शरदिनी : एम०ए० (मराठी व संस्कृत), ६० नियतकालिकांत लेखन, समाज-शिक्षणमालेमध्ये साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, मानसशास्त्र इ० विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफ्लर), 'देवदास' व 'परिणीता' (शरचंद्र चतर्जी), 'आवारा मसीहा' (विष्णु प्रभाकर) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.
- **वैद्य,** डॉ० धनंजय : एम०बी०बी०एस०, पीएच०डी० इंग्रजीत हृद्रोगविषयक लेखन. 'भाषा आणि जीवन' व 'आजचा सुधारक'मध्ये लेख.



अनुक्रमणिका

# पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली, १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' या नियतकालिकाची मालकी व अन्य बाबींसंबंधीचे निवेदन :

१. प्रकाशनस्थळ : पुणे, महाराष्ट्र

२. प्रकाशनाची नियतकालिकता : त्रैमासिक, जानेवारी (हिवाळा),
एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)

३. प्रकाशक व मुद्रकाचे नाव : आनंद काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
राष्ट्रीयता : भारतीय
पत्ता : द्वारा, मृणालिनी शहा, 1 शीतल अपार्टमेंट्स, 46/4 एरंडवणे,
पुणे 411 004
चलभाष : 094216 10704

४. मुद्रणस्थळ : एम०आर० अँड कंपनी, सदाशिव पेठ, पुणे 411 030.
स्थिरभाष : 020-2447 5939

५. संपादकाचे नाव : प्र०ना० परांजपे
राष्ट्रीयता : भारतीय
पत्ता : सी १, सूरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007
स्थिरभाष : 020-2509 4617
चलभाष : 094225 09638

मी, आनंद काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की वर दिलेला तपशील माझ्या माहिती व समजुतीप्रमाणे सत्य आहे.

आनंद काटीकर
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, प्रकाशक



